# नवभारत

या अंकात —




वर्ष २६

अंक दहावा

जुलै १९७३

रु. १-२५




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष सव्विसावे अंक दहावा

# नवभारत

जुलै १९७३

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. मे. पुं. रेगे का. संपादक



वार्षिक रु. १२ अंकास रु. १·२५

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता :

१ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
प्राध्यापकांचे निवासस्थान
कीर्ति कॉलेज, दादर-मुंबई २८

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o दी प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमरावबाडी, मुंबई २ फोन नं. ३५४८५४

अनुक्रमणिका







# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | किंमत |
|---|---|---|
| १. धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | |
| | साधी बांधणी | ८०·०० |
| | कापडी बांधणी | १०४·०० |
| २. धर्मकोश – उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी | १५०·०० |
| | कापडी बांधणी | १८२·०० |
| ३. धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला | | ४५·०० |
| | कापडी बांधणी | ६३·०० |
| ४. मीमांसाकोश भाग १ ते ७ ( संपूर्ण ) | | २५०·०० |
| ५. कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश | | ६·०० |
| ६. बौद्धागमार्थसंग्रहः | | २०·०० |
| ७. वैदिक संस्कृतीचा विकास (सुधारून वाढविलेली आवृत्ती) | ( तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ) | ३०,०० |
| ८. नवमानवतावाद | | २·५० |
| ९. मानवाचा आदर्श | | २·०० |
| १०. चार्वाक – इतिहास आणि तत्त्वज्ञान | ( प्रा. सदाशिव आठवले ) | ३.०० |
| ११. गीता-प्रवेश | (डॉ. गो. वि. देवस्थळी ) | २.५० |
| १२. महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना | (श्री. चा. अ. दाभोलकर ) | २·०० |
| १३. सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदु संस्कृती | (श्री. प्र. रा. देशमुख ) | ४·०० |
| १४. इतिहासाचे तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) | | ६·०० |
| १५. लोकशाहीचे धोके (श्री. पन्नालाल सुराणा) | | २·०० |
| १६. भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श ( सौ. कमल पाध्ये ) | | २·०० |

डॉ. वाय्. जी. बोधे

# मानवी जीवन : एक शास्त्रीय दृष्टिक्षेप

मानवजातीच्या विकासाच्या टप्प्यात सुसंस्कृततेची अभिवृद्धि झाल्यावर, बुद्धिमान् संशोधक विश्वातील व मानवी जीवनातील वैज्ञानिक सत्याचा शोध घेण्याचा प्रयत्न करीत आहेत. जी शास्त्रीय माहिती संशोधकांनी हस्तगत केली व उजेडात आणली त्यावरून विज्ञानाची मुळे अधिकाधिक खोलवर पसरलेली आहेत हे त्यांना कळून चुकले आहे. हाच निष्कर्ष वैद्यकीय विज्ञानाच्या क्षेत्रातही लागू पडतो. वैज्ञानिक सत्याचा शोध घेण्याच्या प्रयत्नात प्रत्येक शास्त्रज्ञाला असे वाटते की, मानवी जीवनातील प्रश्नांची उत्तरे शोधण्यास त्याचे स्वतःचे आयुष्य अपुरे पडत असून, त्या प्रश्नांची उत्तरे कधी अतिजवळ असल्यासारखी पण प्रत्यक्षात दूर व फसवी वाटतात.

## उपनिषदांची गूढ साक्षात्कारवादी दृष्टी –

अलीकडच्या काळात आपण वास्तव्य करीत असलेल्या जगासंबंधी ज्ञान मिळविण्यात अतिशय प्रगति झालेली दिसून येते. त्यात जगाचे भौतिक स्वरूप ( physical nature ), त्यातील प्राणिमात्रांचे जीवन ( biological life ), आणि मानव व इतर प्राणी यांची सूक्ष्म घडण ( microstructure ) इत्यादींबाबत बरेचसे ज्ञान झालेले आहे. असे असून सुद्धा विश्वातील व मानवी जीवनातील मूलभूत तत्त्वांच्या ज्ञानाविषयी आपण अज्ञानीच राहिलो आहोत. वरील पार्श्वभूमी लक्षात घेऊन जर आपण वेद व उपनिषदे यांचा अभ्यास केला तर आश्चर्याची गोष्ट अशी दिसून येते की त्यातून आपणास विश्वाची उत्पत्ती व वाढ कशी झाली व मानवी जीवन कसे निर्माण झाले, याचे ओझरते दर्शन घडते. वेदोपनिषदांमधून जीवनाची उत्पत्ती व विकास व त्यापुढेही जीवनाचा प्रलय किंवा संहार यांचा सखोल विचार गूढ साक्षात्कारवादी ( mystical ) पद्धतीने केलेला आढळून येतो. उपनिषद्–वाङ्मयात तर आपणास केवळ धर्माचाच नव्हे तर तत्त्वज्ञानाचाही विज्ञानाशी समन्वय झालेला दिसून येतो.



अनुक्रमणिका






विश्वोत्पत्तिशास्त्रानुसार उत्क्रान्तीच्या किंवा विकासाच्या मुख्य तीन अवस्था किंवा टप्पे दृष्टोत्पत्तीस येतात : ( १ ) विश्वाची उत्पत्ती व उत्क्रान्ती हा भौतिक टप्पा. ( २ ) सजीव आणि निर्जीव सृष्टीची उत्क्रान्ती. ( ३ ) मोठ्या प्रमाणावर विकसित झालेली बुद्धी आणि मन यामुळे सर्वश्रेष्ठ गणल्या गेलेल्या मानवाची उत्पत्ती व उत्क्रान्ती.

भारतीय वाङमयांतील अत्यंत प्राचीन ग्रंथ म्हणजे ऋग्वेद. त्या ऋग्वेदातील ( १०.१२९ ) नासदीयसूक्तात असे सांगितले आहे की सुरुवातीला काहीही अस्तित्वात नव्हते; फक्त विश्वाची अंधारी पोकळी ( void ) होती. हे विश्व-पोकळीचे तत्त्व उत्पत्तिपूर्वीचे गूढ समजले जाते. हेच मूलतत्त्व होय. उपनिषद्-वाङमयानुसार या पोकळीतून पुढे अस्तित्व ( being ) निर्माण झाले. हे अस्तित्व म्हणजे विश्वाचा मूलभूत परमाणु ( Primary Particle ) होय.

## विश्वाची उत्पत्ती व मूलद्रव्य

आजचे तत्त्वज्ञ व शास्त्रज्ञ वरीलप्रमाणेच विश्वाच्या मूलभूत उत्पत्ति-परमाणूचे संशोधन करण्याचा प्रयत्न करीत आहेत. मूलभूत परमाणू- (Primary Particle ) पासून विश्वात मूल द्रव्य ( fundamental element ) निर्माण झाले. पुढे त्यात निरनिराळे बदल घडून पंच महाभूते निर्माण झाली. ( १ ) आकाश ( space ) ( २ ) वायु ( air ) ( ३ ) तेज ( heat ) ( ४ ) आप् किंवा जल ( physical fluidity ) व ( ५ ) पृथ्वी ( final slowing of the physical transformation ), जीत भौतिक क्रिया अत्यंत मंद झालेल्या आढळून येतात. या पृथ्वी-तत्त्वाचे वैशिष्ट्य असे की त्यात काल आणि दिशा यांच्या प्रमाणात कोणतीही क्रिया किंवा बदल दृग्गोचर होऊ शकत नाही. आधुनिक दृष्टिकोनातून पहाता, मूलभूत परमाणू हे मूलद्रव्याच्या आंतर स्वरूपात दृग्गोचर कण म्हणून आढळतात : उदाहरणार्थ इलेक्ट्रॉन, प्रोटॉन, न्यूट्रॉन. तसेच दुसरेही ऊर्जायुक्त अणही आढळून येतात, जसे फोटॉन, फोनॉन, मॅग्निऑन इत्यादी. अशा प्रकारे विश्वाचे मूल द्रव्य जड अणु व ऊर्जायुक्त अणु यांपैकी कोणत्याना कोणत्या स्वरूपात आविष्कृत होत असते.

नासदीय सूक्तात सुचविल्याप्रमाणे उत्क्रान्तीच्या पुढील अवस्थेत कोणतेही जीवन नसलेल्या सागरातील फेसावर ( scum ) ज्याला सध्या सागरातील जीवयुक्त आवरण ( Biospheric soup of the water ) म्हणतात. त्यामध्ये, प्रकाश-पृथक्करणाच्या क्रियेने मुक्त प्राणवायु ( free oxygen ) निर्माण झाला व त्यामुळे प्रखर सूर्यकिरणांपासून संरक्षण मिळून जीवनिर्मितीस

मार्ग सुकर झाला. पृथग्भवन ( Reduction ) व प्राणवायूचा परिणाम ( oxydation ) या क्रियांमुळे वनस्पतिजीवनात निरनिराळे बदल घडून आले. हरित कणांच्या ( Chlorophyl ) मदतीने प्राणवायूच्या कार्यात अधिक भर पडून वनस्पतिसृष्टीची वाढ अधिक झाली व सजीव प्राण्यांच्या उत्क्रान्तीचा मार्ग सुद्धा मोकळा झाला.

अशा प्रकारे विश्वोपत्ती– (cosmogenesis)च्या क्रमांत काल व अवकाश यांची उत्क्रांती पुढील अवस्थेला पोहोचली. मुण्डक उपनिषदात म्हटल्याप्रमाणे, अग्नी म्हणजे सूर्यकिरणांची शक्ती ही निर्जीव जड सृष्टीचे रूपांतर वनस्पती व इतर सजीव प्राणिसृष्टीत घडवून आणते. त्यातूनच पुढे ती मानवजन्म निर्माण होण्यास कारणीभूत झाली.

या अवस्थेतील पुढील टप्पा म्हणजे शरीर व बुद्धी यांनी संपन्न अशा व्यक्तिमत्वाचा मानव निर्माण झाला. अशा तऱ्हेने जीवसृष्टीची उत्क्रांती एकलिंगी ( asexual ) जीवांपासून द्विलिंगी ( bisexual ) जीवांची उत्पत्ती सुरू होण्यापर्यंत झाल्याचे उल्लेख उपनिषद वाङ्मयांतून आढतात.

जिवंत प्राण्याच्या, विशेषतः मानवाच्या शरीरात अब्जावधी अणूंची जाळी आहेत. ते अणू सेन्द्रिय ( organic ) व निरिन्द्रिय ( inorganic ) द्रव्यापासून बनलेले असून ते कर्ब (carbon) अणूंभोवती विणलेले आहेत. हे अणु त्यांच्या सभोवती फिरत असलेले विद्युदणु ( electron ) यांसह योजनाबद्ध अशा रीतीने रचलेले दिसून येतात. या अणु–परमाणूंनी जीवाणू ( virus ) पासून मानवापर्यंत सर्वांची पार्थिव शरीरे बनलेली आहेत. वरील अणूमधील विद्युदणूंची फिरण्याची दिशा डावीकडे आहे. या फिरण्याच्या क्रियेला 'लेव्होरोटेशन' म्हणतात. विश्वातील ग्रह व तारकापुंज याच दिशेने फिरतात. मनुष्य हा विश्वाचे सूक्ष्म प्रतीक असून त्याला विश्वाचे सर्व नियम लागू पडतात. उदाहरणार्थ, दिक्कालनियम, गुरुत्वाकर्षण व ह्रास इत्यादी.

## आनुवंशिक गुण (gene)

लैंगिक संबंधामुळे अखंड पुढे चालणारा जीवनप्रवाह हा आनुवंशिक गुण ( heredity किंवा gene ) यावर अवलंबून आहे. हा आनुवंशिकतेचा गुण (Gene) प्रत्येक जीवमात्रागणिक विशिष्ट प्रकारचा असून, तो आपले कार्य आपले विशिष्ट नियम व गुणधर्म यांना अनुसरून करीत असतो. त्याचे हे नियम व गुणधर्म स्वतःचे असे वेगळे असून त्यांचे व्यापार अनिर्देश्यतेच्या किंवा अलक्षणीय







अनिश्चिततेच्या ( law of uncertainty ) तत्त्वानुसार चालू असतात. आजच्या वैज्ञानिकांनी तांत्रिक शोधांत मोलाची भर घालून या शास्त्रीय गोष्टींचे ज्ञान करून घेतले आहे. परंतु आपल्या उपनिषत्कालीन पूर्वजांनी अंतःस्फूर्तीच्या द्वारे अगोदरच अगदी अभावितपणे हे निष्कर्ष काढले आहेत.

आधुनिक शास्त्रज्ञाला हे कळून चुकले आहे की, पृथ्वीतलावरील जीवन हे विशिष्ट परिस्थितीत ( homiostatic ) तसेच विशिष्ट तपमानातच ( thermostatic ) टिकू शकते. निर्जीव सृष्टीस मात्र हा नियम आवश्यक नाही. हे असे का असावे याचे शास्त्रीय स्पष्टीकरण बिलकुल देता येत नाही. विशिष्ट परिस्थितीत टिकून रहाणाऱ्या या जीवाणूला काहींनी जीवनज्योत किंवा जीवनस्फुलिंग ( spark of life ) असे संबोधिले आहे. हा जीवनस्फुलिंग प्रज्वलित रहाण्याची क्रिया, सजीव प्राण्याच्या शरीरपेशीमधील सेन्द्रिय अणूंचा कित्येक धातूंशी– विशेषतः फॉस्फरस या द्रव्याशी संयोग होऊन अविरतपणे होत रहाते. तरीही प्रत्येकाचा ऱ्हास का व कसा होत जातो व शेवटी मृत्यु का येतो याचा प्रमाणभूत पुरावा अजून उपलब्ध झालेला नाही.

जिवंत शरीराच्या रचनेत मुख्यतः चार मूल अणुरूप द्रव्ये आढळून येतात : (१) उदजन ( hydrogen ) (२) प्राणवायु ( oxygen ) (३) कर्ब ( carbon ) (४) नत्रवायु ( nitrogen ). यांच्यापासून नत्रयुक्त सेन्द्रिय अम्ले ( aminoacids ) तयार होतात. ही निरनिराळी सेन्द्रिय अम्ले एकत्रित येऊन एकमेकांपासून वेगवेगळे असे प्रचंड शक्तीचे जीवनावश्यक रासायनिक घटक ( polymers ) निर्माण करतात. हे घटक व त्यांची कार्यप्रवणता कमी अधिक प्रमाणात असते. फॉस्फरिक ॲसिड व पेंटोज शुगर ( पंच शर्करा ) एकत्र येऊन त्यापासून न्युक्लाइक ( nucleic ) ॲसिड तयार होते. यालाच शास्त्रज्ञ आपल्या परिभाषेत आर्. एन्. ए. ( R. N. A ) म्हणतात. या आर्. एन्. ए. चे आणखी रूपांतर होऊन डी. एन्. ए. (deoxy nucleic acid ) तयार होते. हेच डी. एन्. ए. द्रव्य आनुवंशिक गुणाला ( gene ला ) पूर्ण व्यापणारे 'जीन' ( gene ) च्या गुणसमुच्चयाचा वारसा पुढे चालविणारे जणू विश्वस्तच (trustee) असून 'जीन' (gene) चे कोडे उलगडून दाखविण्यास सहायभूत होणारे आहे. 'जीन' (gene) हे निसर्गामधील उत्क्रान्तीत घडून आलेल्या शेकडो–हजारो परिवर्तनांचे – जी परिवर्तने घडण्यास युगानुयुगे लागली असतील त्या युगानुयुगांच्या स्मृतींचे सूक्ष्म स्वरूपात जतन करून ठेवणारे एक सूक्ष्मतम भांडारच ( micro– storehouse ) होय.

अनेक पेशींनी युक्त असे प्राणिशरीर हे अतिसूक्ष्म अणूंचे ( sub-atomic particles चे ) बनलेले आहे. त्यामध्ये टप्प्या-टप्प्याने अनेक बदल होत जाऊन जिवंत मानवी शरीर निर्माण झाले आहे. मानवाचा वैश्विक उत्क्रान्तीत टप्प्या-टप्प्याने झालेला बदल गर्भोपनिषदांतील एका भागात ( गर्भोपनिषद ५-७ ) सारांशरूपाने वर्णिलेला आढळून येईल.

गर्भोपनिषदातील ते विशिष्ट वर्णन असे आहे– " मी पुनः पुनः पुनर्जन्माच्या फेऱ्यांतून गेलेला आहे. गर्भाला पूर्व जन्मींची स्मृती असते, त्यामुळे आपण पूर्व जन्मांत काय केले व काय केले नाही हे समजते. मी हजारो गर्भाशयांतून वास केला आहे. मी नाना प्रकारच्या अन्नाची चव घेतली आहे. अनेक मातांच्या स्तन्याचे पान केले आहे. जगाच्या सर्व भागांत मी जन्म घेतलेला आहे व त्या सर्व भागांतून मृत्युही अनुभविला आहे " – वरील वर्णन आधुनिक शास्त्रज्ञांनी केलेल्या 'जीन' ( Gene ) च्या वर्णनाशी मिळते जुळते आहे.

उत्क्रांतीच्या प्रगत टप्प्यातील महत्त्वाची गोष्ट म्हणजे मानवाला मन, बुद्धी, व स्वत्वाची जाणीव असते ही होय. हा सर्वोच्च टप्पा होय. तसेच, मानवाचे जीवन व त्यातील रहस्ये समजावून घेण्याची पात्रताही मानवातच आहे.

ऋग्वेदामधील नासदीय सूक्तात असे सूचित केले आहे की मानवी जीवनाचे आंतर व बाह्य माध्यम ( media ) त्याचप्रमाणे स्वत्वाचे स्वरूप ( nature of the self ) यांचा अभ्यास होणे आवश्यक आहे. मानवी जीवनाचे आंतर माध्यम ( internal media ) म्हणजे मन, बुद्धी स्वत्वाची जाणीव व ज्ञान ही होत. वरील घटकांच्या अस्तित्वाचे विवेचन धार्मिक व तात्त्विक दृष्टिकोनातून केलेले वेद व उपनिषदे यामधून आढळते. त्यात गर्भित असलेले शास्त्रीय तत्त्व कोणीही डावलू शकणार नाही. शेवटी ते मान्यच करावे लागेल. मानवाचे शरीर व त्यातील कार्यप्रवण मेंदू निर्माण करण्यात निसर्गाचा वाटा याबाबत प्राचीन भारतीय विचारवंतांनी विचार केलेला आहे.

सांख्य मतप्रणाली ही ब्रह्म आणि आत्मा एकच मानणाऱ्या अद्वैतविचार-प्रणालीपेक्षा भिन्न आहे. द्वैतप्रणालीची सांख्यपद्धती ही वेद व उपनिषदे यामधील विचारांचा भिन्न व पृथक्करणात्मक ( diverse and discursive ) अर्थ लावते. सांख्याची मतप्रणाली वैद्यकशास्त्राचा पाया म्हणून चरक, सुश्रुत इत्यादी वैद्यकशास्त्रज्ञांनी मानिली आहे.

अनुक्रमणिका





प्राणशक्ती

सांख्य तत्त्वप्रणालीप्रमाणे, मानवी विकासात 'पुरुषतत्त्व' हे एक प्रमुख तत्त्व मानले जाते. स्मरणशक्ती, मन आणि बुद्धी हे 'पुरुषतत्त्व' प्रतिबिंबित करणारे मधले ( intermediary ) टप्पे होत. जड शरीर आणि मन यांनी एकत्र घडविलेले मानवी जीवन ही प्रकृतीची 'विकृती' होय. प्रकृती हे सांख्यांचे दुसरे प्रमुख तत्त्व आहे. त्या प्रकृतीत 'विकृती' होऊन बुद्धी, अहंकार, मन इत्यादी 'विकार' निर्माण झाले. प्रकृतीमधून उभे ( उच्च-नीच ) आणि आडवे ( समांतर) ( vertical and horizontal differentiation ) असे बदल घडून येऊन मनोयुक्त शरीर असलेला मानव निर्माण झाला. संक्षिप्तपणे सांगायचे झाल्यास असे दिसते की पुढील तीन तत्त्वानुसार मानवी जीवनसृष्टी घडलेली आहे : १ अतिभौतिक वैश्विक तत्त्व ( metaphysical cosmic principle ) ( २ ) जैव-मानस ज्ञानतत्त्व ( psycho-biological principle of consciousness ). ( ३ ) जीवसृष्टीतील प्राणशक्ती ( Biological life-force ). शेवटल्या दोन तत्त्वांतून प्राण हीच जीवनशक्ती मानलेली आहे. ऋग्वेदाच्या अभ्यासकांना हे विदितच आहे की ऋग्वेदात अश्व हा प्राण-तत्त्वाचे प्रतीक मानलेला आहे. उत्साह आदि ज्ञानतंतूंची शक्ती ( nervous energy ) प्राणशक्ती किंवा जीवनदायी श्वासोच्छ्वास यांमधून आविष्कृत झाली आहे. प्राण हा अंशतः मनोमय व अंशतः जड असून त्याच्या चैतन्यदायी क्रिया-शीलतेमुळे चिच्छक्तियुक्त मन व अचित् जड यांचा संयोग घडून येतो.

ही वैश्विक प्राणशक्ती उत्पादक ( creative ) असून तिचा फक्त जीव-सृष्टीत आविष्कार होतो. ती अतिसूक्ष्म परमाणुरूप अशी प्रचंड शक्ती असून तिचा आविष्कार मर्यादित स्वरूपात होत असतो. प्लेटो व ॲरिस्टॉटल यांनी अशा प्राणशक्तिवादा– ( vitalism ) चा पुरस्कार केला आहे.

आपले आजचे प्रगत शास्त्र अद्यापि जीवनशक्तीचे गूढ उकलू शकले नाही. मानवी जीवनाचा जीवशास्त्रीय व आध्यात्मिक अर्थ समजून घेण्यास आपले हल्लीचे उपलब्ध शास्त्रीय ज्ञान अपुरे पडत आहे. याउलट, अध्यात्मतत्त्वप्रणाली मोक्ष किंवा निर्वाण म्हणजे मूलभूत वैश्विक तत्त्वात विलीन होणे हे ध्येय गाठण्याचा तळमळीने प्रयत्न करीत आहे. आध्यात्मिक प्रवृत्तीचे पुरुष पूर्णत्वाची स्थिती म्हणजे अशा प्रकारच्या अतिमानवा– ( superman ) ची स्थिती प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न करीत आहेत, की जो अतिमानव दिक्कालबंधनाच्या पलीकडे जाऊ शकेल व कल्पनेच्या कक्षेत येणाऱ्या निरनिराळ्या स्वरूपात भ्रमण करू शकेल.

## तंत्रविषयक प्रगती व नैतिक मूल्ये

आधुनिक जीवशास्त्रज्ञ व इतर वैज्ञानिक संशोधक तंत्रविषयक ( technological ) प्रगती करीत असले तरी त्यांना मानव्याचा ऱ्हास स्पष्ट दिसत असून, मानवाचे आचरण व नैतिक मूल्ये यात अधोगती होत आहे याची त्यांना जाणीव आहे. जीवशास्त्रज्ञाला आनुवंशिक बदलांचे ( genetic mutation ) ज्ञान होत असून त्यायोगे प्राणिसृष्टी व मानव यांच्यात इष्ट ते परिवर्तन घडवून आणण्याचा तो प्रयत्न करीत आहे. परंतु खेदाची गोष्ट ही की मानवाच्या सामाजिक नैतिक विकासाची गती वैज्ञानिक तंत्रविषयक प्रगतीच्या वेगाच्या मानाने फारच मंद व मागे आहे. जोपर्यंत दोहोंचा समप्रमाण समन्वय साधला जाणार नाही तोपर्यंत आपल्या भीषण भवितव्याचे भूत मानवाला भेडसावीत राहुन, त्याची कृष्ण छाया मानवी जीवनावर पडणार, यात शंका नाही. आज मानवाला असा विचार करण्याची वेळ आलेली आहे की भविष्यकाळात, सध्याच्या अणुयुगाची प्रगती आध्यात्मिक क्षेत्रातही करून आपण अतिमानवा- ( superman ) ची पदवी गाठणार की अतिप्राचीन काळी जसे अजस्त्र राक्षसतुल्य दिनोसॉर ( Dinosaur ) प्राणी उत्पन्न होऊन नाश पावले त्याचप्रमाणे आपणही स्वतः नष्ट होऊन जाणार !



कै. अ. का. प्रियोळकर

# सर्वेश्वराचा ज्ञानोपदेश

## ( अठराव्या शतकाच्या आरंभीं एका पोर्तुगीजानें लिहिलेला मराठी गद्य ग्रंथ )

### ॥ चोउता भाग ॥

॥ कष्टवल्या स्वामीचें वर्तमान सांगतों पैलें ॥ ग्न्यानसुर्याचें तेज ॥ येजु स्वामीयाना ॥ माणुसाच्या पापा कुर्ती अपदा कष्ट सोशीले ॥ म्हणुन वर्तमान दाखवीतें ॥

दुखणेकारांच्या डोळचांस सुर्याचें प्रकाश वाईट दिस्तें ॥ म्हणुन तें बगायास सोसत नाहीं ॥ कीतुकें प्रकाश बगीतलें ॥ ईतुकें दुखणें त्यास आदीक येते ॥ छ ॥ प्रकाश बगना होयाला ॥ डोळे झांकुन ॥ आंदकारांत राहायाला सुखे दिस्तें ॥छ॥ ऐसें पापीयां शास्त्री गुरु जुदेवां ज्ञालें ॥ छ ॥ येजु स्वामी सत्यवंत देव ॥ सत्यवंत माणुस सुर्याउन पुण्यकरणीयांनी आदीक आदीक प्रकाशले ॥ छ ॥ त्याचीं नवलें ॥ पुंण्याचीया करणीया थोर प्रकाशाचें तेज होतें कीं ॥ हें ईतुकें त्यां पापीयालां नेदुकाच्यारावदल बहु कामा नये ज्ञालें ॥ छ ॥ म्हणुन येकदां स्वामी जेजु धरायाला लस्करी माणुसें धाडीली ॥ ते लस्करी ॥ जेजुस्वामीयाचें वचन ऐकुन ॥ त्यास धरीनास्तां ॥ उगेच गेले ॥ छ ॥ अणीक येकदांव ते शास्त्री गुरु धोंडे घेउन ॥ स्वामीयास मारावयास गेले ॥ जेजु स्वामी त्यांमधें अदृश होउन गेले ॥छ॥ म्हणजे येजु स्वामीयाच्या सामर्थावीण ॥ अवघें संसार मेळून ॥ त्याला रजमात्र वाईट करवत नाहीं ॥छ॥ अणीक लोकतर ॥ येजु स्वामी याचीं नवलें पुंन्याचीं कार्यें बगुन त्यांवर थोर भक्ती ॥ मया ठेवीली ॥ छ ॥ म्हणुन येकदा जेजु स्वामी ॥ अपल्या आपोस्तोलां देखील ॥ जेरुजालें म्हणाऱ्याच्या देउळास जातांना ॥

त्या शारास आले होते आगणीत लोक ॥ बाळें देखील ॥ जेजुस्वामीयासह चालून ॥ वाटेवर तोरणे बांधुन ॥ धटी पीतांबर पायेघडीया घालुन ॥ जेजु









स्वामीयाचें थोर मानस्तोत्र उदंड शब्दानी बाळें देखील गाउन ॥ देउळा परीयंत्र स्वामी बराबरी गेले ॥ छ ॥ समस्त लोक ॥ जेजुस्वामीयाला ईतुकें मान देउन ॥ ईतुकी स्तुती गात्यात म्हणुन ॥ जुदेव शास्त्री गुरु बगुन ॥ अदीं स्वामीयावर ठेवीला दावा ॥ बिस्त्यावर अगणीत तेल घातलें तेथेंच जळलें ॥ छ ॥ स्वामीयास जीवी मारायाला चींतुन ॥ आपणामधें ऐसें बोलुं लागले ॥ अम्हांच्याने कांही करवत नाहीं म्हणुन ॥ तुम्हीं बगतां कीं ॥ समस्त लोक त्या संगाती मेळुन जात्यात ॥ म्हणुन अम्हीं बगतों कीं ॥ तर ह्यास कोण उपाव करावा ॥ बगा ॥छ॥ हे अपणामधें चींतुन सांगत होते ॥ छ ॥ ह्याबद्दल त्या दिवसाधर्नें जेजु स्वामी जीवीं मारायाला निश्चय करून ॥ समय बगीत होते ॥ छ ॥ ह्या कुर्ती ॥ जेजु स्वामी त्या उपर जुदेय म्हणायाच्या मुलकांमधें चालनास्तां ॥ राणाजवळ हेफरें म्हणायाच्या शारास अपल्या शीशां संगातीं गेले ॥ छ ॥ सर्वेश्वरान अपण माणुसा कुर्तीं ॥ प्राण देयाला नेमीलें काळ परीयंत्र तेथेंच राहीले ॥ छ ॥ येजु स्वामीयाला पाहीजे तर ॥ वैन्यांमधें आबृश होउन राहुं ये ॥ सत्यवंत देव म्हणुन ॥ छ ॥ पण सत्यवंत माणुस म्हणुन दुर जाउन अम्हांस बुधी शीकवायाला लपले ॥ कोण वीघ्न समय आलें तर ॥ गर्जेवीण नवल सर्वेश्वराजवळ मागुं नये ॥ पण बुधीवंत होउन ॥ हांकार करीनास्तां ॥ समयासारीखें उपाव करावा ॥ छ छ छ छ छ ॥

## ॥ दुसरें तेज ॥

### ॥ जुदस घातकी येजु स्वामीयास वीकायाला निश्चय केला म्हणुन ॥ वर्तमान सांगुन दाखवीतें ॥

पास्कव जातरेच्या अदीं साहा दिवस ॥ जेजु स्वामी बेतानीये म्हणायाच्या शारास आले ॥ छ ॥ तेथें च्यारी दिवस मेल्या उपर समावीत होता देव सहाये म्हणायाचा जेजु स्वामी याचा शिश ॥ त्याला स्वामीयानें बाहीर ये म्हणुन ॥ अदीं सांगुन ॥ जीव देउन उठवीला म्हणुन ॥ अदीं सांगीतलें कीं ॥ छ ॥ तेथें जेजु स्वामीयाला पंगती केली होती ॥छ॥ त्या पंगतीमध्यें देवसहाये येक बैसुन ॥ जेवीत होता ॥छ॥ त्यास दोगी जणी बहीणी मार्थाई अणीक मरीय म्हणायाचीया होतीया ॥छ॥ मार्थ म्हणायाची पुंन्ये आस्त्री आंकुवारी जेवण आणुन वाडीती ॥ मरीय म्हणायाची जेजु स्वामीयावर थोर भग्ति ठेउन ॥ चारी शेर उंच मोलाचें परीमळ तैल घेउन ॥ जेजु स्वामीयाच्या मागें राहुन ॥ स्वामीयाच्या मस्तकास ॥ अणीक पायांस लाविलें ॥ छ ॥ अपल्या केसांनी पायेपुसुन ॥ पायां पडुन दाम घेतलें ॥छ॥ तदवां ॥ जेजु स्वामीयाच्या बारा शीशांमधें ॥ जुदस ईस्करीयोतस

म्हणायाचा मरीय माग्दलेन पुंण्य आस्त्रीयावर बहु राग्याला ॥ ईतुकें उंची मोलाचें तईल सांडीलें म्हणुन ॥ तें ३०० तीनीशें रुपयास आदीक विकुन ॥ दुर्बळांस देउन ॥ धर्म करूं ये म्हणुन जुदान सांगीतलें ॥छ॥ हें जेजुस्वामी ऐकुन ॥ जुदाला ऐसें सांगीतलें ॥ तीला राग्येउं नको ॥ तीने अम्हांवर तें बरें केलें ॥ दुर्बळ तुम्हांजवळ सदा आहेत ॥ अम्ही तर तुम्हांजवळ सदा असत नाहीं ॥ म्हणुन स्वामीयाने बुधी सांगीतलि ॥ छ ॥ म्हणजे दुर्बळांस धर्म केलें तर बरें ॥ पण त्याहुन ॥ जेजुस्वामीयाच्या भवितने केलें तें बरें ॥छ॥ अणीक कितुकें जेजु स्वामीयाचीया भक्तीन खर्चीलें ॥ सांडीले म्हणुन चिंतु नये ॥ पण कितुके जेजु स्वामीया कुर्ती खर्चिलें ॥ ईतुकें परलोकी ठेवीलें म्हणुन ॥ जेजु स्वामीयाने पवित्र मुखांनी सांगीतलें ॥ छ ॥ जुदस ईस्करीयोताची रुपयांची आशा भुत बगुन ॥ त्याच्या मनांत शीरलें ॥ छ ॥ ह्याबदल ॥ जुदेव शास्त्री गुरु जेजु स्वामीयाला जीवीं मारायाला चींतीत्यात म्हणुन ॥ जुदस ईस्करीयोत समजुन ॥ त्यांजवळ जाउन ॥ स्वामीयास बोनगायाला ॥ अपणास काये देईल ॥ म्हणुन सांगुन पुशलें ॥छ ॥ वैरी बहु सतोषान ३० तीस रुपया देउं ॥ म्हणुन सांगीतलें ॥ छ ॥ ह्या दिवसा धर्नें कैसें अपला सत्यवंत देव गुरु बोपी म्हणुन ॥ जुदस घातकी समय ागुन येत होता ॥ छ छ छ ॥

## ॥ तीसरें तेज ॥

### ॥ जेजु स्वामी ॥ पास्कव साजरा करून शीशांचे पाये धुहुत्यात म्हणुन ॥ वर्तमान सांगुन दाखवीते ॥

त्यामधें पास्कव जातरा ॥ देवाच्या फरमाणासारीखे ॥ करायाला वख्त आलें ॥छ॥ तदवां स्वामीन दोनजण शीश जेरूजालें शारास धाडुन ॥ येक माणुस जवळ ॥ पास्कव जातरा करायाला जागा मागीतला ॥छ॥ म्हणजे पास्कव जातरेचा दिवस पावला म्हणुन ॥ शीशांनी स्वामीजवळ ऐसें पुशलें ॥ कोठें तुम्हांस पास्कव मुस्तैदी करायाला मन आहे ॥छ॥ तदवां स्वामी दोगे शीश धाडुन ॥ ऐसें सांगीतलें ॥छ॥ तुम्ही शारास जावा ॥ तेथें पावतांच ॥ तुम्हांस येक माणुस घागर खांद्यावर घेउन भेटला ॥ तु त्या मागें जावा ॥ कोणत्या घरांत रीगल ॥ त्या घराच्या धण्याला हें सांगा ॥ गुरु ऐसें म्हणत्यात ॥ पास्कव जातरेमधें अम्हच्या शीशांसंगे आरोगण करायाला ॥ असराम कोठे ॥ तदवां तो तुम्हांस थोर शीणगारला साळ दाखवील ॥ तेथें मुस्तैद करा म्हणुन स्वामीने सांगीतलें ॥छ॥ तईसेंच सारीखें झाले ॥छ॥ त्या साळांत शीशांनी मुस्तैद केलें ॥छ॥ त्यांत स्वामी येउन ॥ अपल्या बारा शीसां





संगाती ।। पास्कव जात्रा केली ।।छ।। तेथें ।। वेदांत लीहील्या प्रमाणी जेवण केल्या उपर ।। दोनी थोर आश्चर्यें जेजुस्वामीयान केलीं ।। छ ।। पैलें ।। ते सत्यवंत माणुस ।। सत्यवंत देव ।। समस्तांस श्रेष्ट गुरु आस्तां ।। चाकरासारीखें ।। समस्तां शीशांचे पाये धुहुन ।। बोलीने पुशीले ।।छ।। ईतुवयामधें भवत रायनाथ म्हणायाचा आभीष्ट होउन ।। सर्वथामाजे पाये धहुं देईनां म्हणुन स्वामीयास लेहीणेन सांगीतले ।।छ।। तदवां स्वामी(ने) रायनाथाला ऐसें सांगीतलें ।। अम्ही तुझे पाये धुहीनां तर ।। तुला आम्हांजवळ वाटा नाहीं ।।छ।। म्हणजे दोगां जणामधें ईष्ट नाहीं ।। मया नाहीं ।।छ।। तदवां रायनाथान स्वामीयास पायां पडुन सांगीतलें ।। स्वामी तैसें तर ।। पाये मात्र नाहीं ।। पण हात अणीक मस्तधुहावें ।।छ।। समस्तांचे पाय धुहुतल्या उपर ।। शीशांला लेहीण दाक्षणाची ।। मयाचीबुधी सांगीतली ।।छ।। म्हणजे जर अम्हीं ।। धणी ।। गुरु आस्तां ।। तुम्हांचे पाये धुहुतले ।। तर तुहीं येकमेकास करावे ।। येकमेकावर मया दाखवावी ।। छ ।। पण स्वामीयान इतुकें पुंन्ये करुन अम्हीं समजल्या उपर ।। ह्यावर अणीक कोण अम्हांस बुधी होवी ।। त्याचीया करणीयांची बुधी पुरे ।।छ।। समस्तांचा साहेब ।। धणी ।। गुरु चाकरासारीखें ।। माणुसाचे पाये धुहुतले ।। अम्हीं सर्व हांकार पायाखाली टाकुन ।। दाक्षणा पुंन्ये करुन ।। स्वामीयाने दाखवील्या त्या वाटेवर चालावें ।। छ छ छ ।।

## ।। चोउतें तेज ।।

।। स्वामीयाने अपुल्या मयाचे आठवण माणुसांत होयाला ।। अणीक माणुसांजवळ संसार सरेपरीयंत्र माणुसपणी राह्याला ।। उत्म देवप्रसादाचें नवल केलें म्हणुन वर्तमान दाखवीतें ।। छ ।।

आतां सांगीतल्या आश्चर्याहुन थोर दुसरें आश्चर्य सांगतों ।।छ।। जेजु स्वामी अपल्या अनादि देव पीत्या सर्वेश्वराला ।। अपुले प्राण शीलुंव्यावरी माणुसा कुर्ती देयाला काळ आले म्हणुन समजुन ।। अपल्या भग्तीवंत माणुसांस अपलें शरीर देव भोजन देउन ।। संसार सरेपरीयंत्र माणुसां संगाती राहायाला ।। समस्ताहुन थोर मयाचें नवल केलें ।।छ।। म्हणजे ।। त्या पवीत्र बेहस्पतवारीं रात्री भोजनामधें अपल्या मरणाचें आठवण करुन ।। शुक्रवार दिवशीं मरण पावतील म्हणुन समजुन धंवाची भाकर अपल्या पवीत्र हातांत घेउन ।। परलोकीं बगुन ।। भाकरीस आशीर्वाद देउन ।। शीशांजवळ ऐसें बोलुं लागले हें अम्हंचें शरीर ।। तुम्हांबदल ।। अणीक उदंड माणुसां कुर्तीं पापीयांच्या हातांत मरायास वोपुन देतील ।। हें तुम्ही घेउन खावा म्हणुन सांगुन ।। शीशांस खायास दिलें ।।छ।। याउपर द्राक्षाचें रस घेउन ।। ऐसें

अनुक्रमणिका

सांगीतलें ॥ हें अम्हंचें रग्त ॥ तुम्हा कृतीं ॥ अणीक उदंड माणुसांबदल पाप निवारण होयाला सांडवीतील म्हणुन सांगुन ॥ शीशांस पीयास दिलें ॥छ॥ अणीक ही पुजा तुम्ही कदवांतर कराल ॥ अम्हंचें आठवण करून करावें म्हणुन सांगीतलें ॥छ॥ तदवां स्वामीयाने घंवाची भाकरी बगुन ॥ हें अम्हचें शरीर म्हणुन सांगीतलें ॥ तदवां घंवांचा सुभाव नाहीं होउन ॥ जेजु स्वामीयाचें शरीर त्या घंवाच्या गुणांमधें उतरलें ॥छ॥ म्हणजे कोण आवार वस्तुला दोनी आहेत ॥ म्हणजे सुभाव ॥ कीं संसार ॥ अणीक गुण म्हणजे पांडरें ॥ काळें ॥ परीमळ ॥ रुच ॥ लांब ॥ रुंद ॥ अणीक गुण आहेत ॥छ॥ म्हणुन असलीं घंवाचीं गुणें उरलीं ॥ घंवाचा सुभाव पालटुन ॥ स्वामी जेजु क्रीस्ताचें शरीर ॥ घंवाच्या सुभावाच्या जाग्यावर गुणामुळें उतरलें ॥ अणीक तें शरीर जीवंत शरीर ॥ म्हणुन रग्त आत्मा देखील आहेत ॥ देव सुभाव आत्म्यास ॥ अणीक शरीराला सदां येक मेळुन आहे म्हणुन ॥ या घंवाच्या गुणांमघे सारा स्वामी जेजु क्रीस्त ॥ परलोकीं आहेत तैसेंच ॥ त्यांत आहे म्हणुन सत्य मानावें ॥छ॥ अणीक तैसेंच द्राक्षाचा रसा नेमुन ॥ हें अम्हचें रग्त म्हणुन जदवां सांगीतलें ॥ तदवां द्राक्षाचा रसाचा सुभाव नाहीं होउन ॥ त्याच्यां गुणांमधें जेजु स्वामीयाचें रग्त उतरलें ॥ छ ॥ सें रग्त जीवंत माणुसाचें रग्त म्हणुन ॥ शरीरा ॥ आम्हावीण राहात नाहीं ॥छ॥ अणीक जैसें शरीरावर उन रग्त ॥ आत्मादेखील घंवाच्या गुणांमधें सारा क्रीस्तु आहेत ॥ तैसेंच रग्तावर उन शरीर ॥ आत्मादेखील ॥ द्राक्षाच्या रसाच्या गुणांमधें सारा क्रीस्तु आहेत ॥ सत्यवंत देव ॥ सत्यवंत माणुस परलोकीं आहेत तैसेंच त्यांत आहेत म्हणुन खरें करावे ॥ स्वामीयाने सांगीतलें म्हणुन ॥ स्वामीयाचें उतर स्वामीयाचें मन ॥ स्वामीयाचें बल येक ॥छ॥ तर हें अम्हचें शरीर ॥ हें अम्हचें रक्त म्हणुन सांगतांच ॥ सदेवावीण स्वामीयाचें शरीर स्वामीयाचें रग्त त्यांत आहेत म्हणुन खरें करावें ॥छ॥ अदीं काहीं ग्होतें तदवा ॥ तैसेंच परलोक ॥ भुलोक ॥ त्यांत आहेत ईतुकीया वस्ता होउं म्हणुन सांगुन ॥ अवघें रचीलें ॥ त्याच अपरांपर बळान अपल्या शरीराच्या ॥ रग्ताच्या उतम उपकाराचें नवल केलें म्हणुन कोणास अनुमान येउं नये ॥छ॥ जैसें स्वामीयाने ॥ माणुसांच्या पापांकृतीं अनादि पित्या सर्वेश्वराला अपल्या शरीराची ॥ रग्ताची पुजा केली ॥ तैसेंच अपल्या शरीरा शीशांला करायाला गुरुपट देउन हुकुम दिलें ॥छ॥ अणीक त्या शीशांनी ॥ जेजु स्वामीयाच्या हुकुमेन ॥ त्याच्या नावानें अणीका भग्तांस ॥ तीच पुजा करायाला ॥ गुरुपट देयास हुकुम दिलें ॥ छ ॥ म्हणुन जदवां सर्वेश्वराचा सत्यवंत गुरु पुजा करून ॥ घंवाची भाकर ॥ अणी द्राक्षाचा रसा घेउन ॥ जेजुस्वामीयाच्या नांवानें ॥ त्याच स्वामीयानें सांगीतलीं पवीत्र उतरे गुरु सांगतांच तदवांच स्वामीने जेजु

क्रीस्तु ॥ खरा देव ॥ खरा माणुस ॥ कुडी रगत ॥ आत्मा ॥ देवपण देखील ॥छ॥ घंवाच्या भाकरीच्या गुणांमधे ॥ अणीक द्राक्षाच्या रस्याच्या गुणांमधें सदेवावीण उतरत्यात ॥छ॥ जेजु स्वामीयाचें शरीर ॥ म्हणजे देवप्रसाद सर्वेश्वराच्या भक्तांनी अदीं पाप नीवारण करून ॥ भग्तीनें ध्यावें ॥छ॥ जो कोण क्रीस्तभग्त म्हणायाचा स्वामी जेजु क्रीस्ताचा शीश ऐसें घेतों ॥ त्याच्या आत्मास उदंड बरवीं येत्यात ॥ पापानें घेतले तर त्याला उदंड निर्भाग्ये येईल ॥ देव दुरोग केलें म्हणुन ॥ छछछछछ

## ॥ पांचवे तेज ॥

॥ जेजु स्वामी उत्म देवप्रसादाचें नवल ॥ त्या रात्रीमधें केल्या उपर ॥ उलीवती म्हणायाच्या डोंगरास ॥ आदिपित्या सर्वेश्वराला जपध्यान करायाला गेले म्हणुन वर्तमान सांगुन दाखवीतें ॥

त्या पवीत्र ब्रहस्पतवारीं रात्रीच्या उत्म जेवणांत जेजु स्वामी आस्तां ॥ त्या बारा शीशांमधें येक अम्हांस पापीयांच्या हातांमधें दाउन देईल म्हणुन सांगीतलें ॥ पण कोण त्यो म्हणुन उगडें केलें नाहीं ॥छ॥ हें वर्तमान ॥ जुदस वेगळें करून अणीक शीश ऐकतांच ॥ त्यांला थोर दुख झालें ॥छ॥ अपणामधें इतुकें पाप ॥ दुरोग कोण करील म्हणुन ॥ तें अणीकां शीशांस कळत ना होते ॥छ॥ निर्लाज घातकी जुदस ॥ मीं काये स्वामी ॥ म्हणुन स्वामीयास पुशलें ॥छ॥ तें पवीत्र जेवण ॥ नवलांचीं कार्य संपादल्या उपर ॥ दोनी वाटा झालीया ॥ जुदस घातकी याला येक येक येजु स्वामीयाला ॥छ॥ स्वामी अकरा शीशां संगाती ॥ उलीवेती म्हणायाच्या डोंगरावर ॥ जेसमनी मळचांत ॥ अनांदी देवपित्याला ॥ पापीयां कृतीं जपध्यान करायास गेले ॥छ॥ जुदस घातकी ॥ जेजु स्वामीयास ॥ पापीयांच्या हातांत ॥ तीस ३० रुपयांनी दाउन देयाला ॥ वेन्यां गुरुजवळ गेला ॥छ॥ जेजु स्वामी मळचांत पावतांच ॥ अकरा शीशांमधें तीरांजण म्होरे बोलाउन ॥ त्यांला येक जाग्यावर राहउन ॥ जप करा म्हणुन सांगीतलें ॥ छ ॥ अपण ॥ येज हात धोंड्याईतुकें दुर ॥ म्होरे जाउन देवपीत्याला जपध्यान करूं लागले ॥छ॥ कटकटा देवा ॥ दोन श्यैन्य जेजुस्वामी हुजीर द्रिष्टी पडलीं ॥ येक पापीयांचें ॥ येक दग्दाचें ॥ पापीयां कृतीं मरेपरीयंत्र देवाचीया नीतीला फारीक करायाला पाहीजे म्हणुन ॥छ॥ ईतुक्यामधें जेजुस्वामीयाचें पवित्र शरीर पाउसासारीखें रग्ताचें घाम ॥ भोईं भिजे परीयंत्र पडलें ॥छ॥ तदवां परलोकींतून येक देवदुत स्वामीया जवळ उतरून ॥ ऐसें सांगीतलें ॥ तुम्ही सत्यवंत देव सत्यवंत

माणूस ॥ पापीया कृतीं कष्टुंन ॥ शीलुव्यावर प्राण देउन ॥ देवाचीया नीतीला फारीक करायाला माणुसपण घेतलें कीं ॥छ॥ तर ॥ अम्हंचा साहेब धणी ॥ हें अदीं तुमचें मन ॥ अणीक तुम्हंच्या अनादी देवपित्याचें ॥ ह्या वरउन देवास कितुकें आगीं ॥ कितुकें स्तोत्र येईल ॥ थोर कीं ॥ माणुसास कितुकें पुन्ये देवदुतांस कितुकें संतोष मेळल ॥ आगणीत मेळल ॥ भुतास कितुकें मोड ॥ कितुके कष्ट ॥ लाज दिसल ।: कितुकें निर्भाग्ये पावल ॥ गणता नाहीं ॥ म्हणुन सांगवत नाहीं ॥छ॥ तुम्ही अवघे अपरांपर जाणते ॥ तुम्ही अम्हांस जाणवितां ॥ तुम्हां हुजीर अम्हीं जाणते न्हवे म्हणुन स्वामीयास सांगुन नमस्कार करून गेला ॥

## ॥ साहावें तेज ॥

### ॥ जुदस घातकी शैन्य आणुन ॥ जेजु स्वामीयास धरून न्हेलें म्हणुन वर्तमान सांगुन दाखवीतें ॥

ईतुक्यामधें जुदस घातकी शैन्य घेउन ॥ स्वामीयास जतनेन धरून न्हेयाला ॥ लस्कऱ्यांस हें खुण सांगीतलें ॥छ॥ तुम्ही अम्हेंच्या गुरुला वळखत नाहीं कीं ॥ तर मीं म्होरे जाउन ॥ कोणांस दाम देईन ॥ त्योच ॥ त्याला तुम्ही जतनेन धरा ॥ ईतुकें जेजुस्वामी दुरद्रिष्टीने बगीत होते ॥ म्हणुन उठुन ॥ अकरा शीशांस बोलाउन ॥ वैऱ्यांस धुंडायास आले ॥च॥ तदवां घातकी जुदस म्होरे येउन ॥ स्वामी याला दाम देउन ॥ नमो गुरुवे म्हणुन सांगुन ॥ स्वामीयास भेटला ॥छ॥ तदवां त्याला स्वामीनी हें प्रति उतर दिलें ॥ ईष्टा अम्हांस दाम देउन ॥ पापीयाच्या हातांत वोपुन देतोसकां ॥ म्हणुन त्यास सांगीतलें ॥छ॥ ह्या उपर स्वामी शैन्यास बगुन ॥ कोणास धुंडीत आला म्हणुन पुशलें ॥छ॥ त्यांनीं ॥ जेजु म्हणुन सांगुन ॥ स्वामीला प्रती उतर दिलें ॥छ॥ तदवां स्वामीनें ॥ जेजु अम्हीच ॥ म्हणुन त्यांस सांगीतलें ॥छ॥ हें सांगतांच ॥ अवघे उताणे पडले ॥छ॥ म्हणजे स्वामीयाने अपलें देवबळ दाखवीलें ॥छ॥ ह्याबदल अपलें नांव ऐकून ॥ अवघे उळते पडायाला पुरे झालें ॥छ॥ स्वामीयाला पापीयां कृतीं कष्टायाला मन न्होतें तर ॥ कोणाच्यान त्याला हात घालवत नाहीं म्हणुन दाखवीलें ॥छ॥ दुसऱ्यान उठायाला त्या रजा दिली ॥छ॥ ईतुक्यामधें श्रेष्ठ शीष्य रायाजी खर्ग मेणांतने काडुन ॥ येका चाकराचे कान तोडीलें ॥छ॥ तदवां स्वामी रायाजीला आगराउन ॥ खर्ग मेणांत घाली ॥ अम्हांस होवें तर ॥ अम्हंचे अनादि पिता कोटा न कोटी देवदुत धाडीतील ॥ पण पापीयां कृतीं अम्हीं जें सोसावें आहे ॥ तें सोसुं नको म्हणुन तुं चींतीतोस कां ॥ माणुसां कृतीं कष्ट सोसावे ॥छ॥ रायाजीला ऐसें बुधि सांगुन ॥ चाकरास कान लाउन ॥

अदीं होते सारीखें दीसायास केलें ।।छ।। ह्या उपर दुसऱ्याने शैऱ्यास बगुन ।। तुम्ही कोणास धुंडीतां म्हणुन पुशलें ।। त्यांनी जेजु म्हणुन दुसऱ्यांने सांगीतले ।।छ।। तदवां स्वामी ।। जेजु अम्हीं अदीं तुम्हांस सांगीतलें कीं ।। अम्हीं तुम्हाजवळ सदा देउळांत होतों ।। तदवां तुम्हीं अम्हांस धरीलें नाहीं ।। आतां शील भाले घेउन ।। चोरायाला धरायाला येत्यात तैसें ।। अम्हांस धरायास आलां ।। आतां तुम्हांचावेळ ।। अणीक आंदकाराचें बळ ।।छ।। अम्हांस धुंडीतां तर ।। अम्हंचे शीश जाउं द्या ।। म्हणुन स्वामीयानें त्यांस सांगीतले ।। हें सांगतांच ।। वैरी लस्करी भुक्या लांडग्यासारीखे मेंडऱ्याच्या पिलावर पडत्यात तैसें ।। जेजु स्वामीयावर पडले ।।छ।। हातास ।। कमरेस ।। गळयास दोर घालून बांदीले ।। स्वामीयाचे शीश सारे पळून गेले ।।छ।। वैऱ्यांनी स्वामीयास मारीत ।। कस्टवीत गुरहुजीर न्हेले ।। छ छ छ छ छ ।।

## ।। सातवें तेज ।।

### ।। जेजु स्वामी पापींया गुरुच्या घरांत कष्टवीले म्हणुन ।। त्याचें वर्तमान सांगुन दाखवीतें ।।

त्या पवीत्र ब्रेहस्पती वाराच्या रात्रीं जेजु स्वामीयास त्या गुरुच्या घरांत नेले म्हणुन सांगीतलें कीं ।।छ।। तर स्वामीयास ।। सकाळी मणसुभीदाराजवळ न्हेयाला ।। त्यावर गुन्याव लाहायास गोही धुंडीत होते ।। छ ।। पण स्वामीयावर कदी रजमात्र गुन्याव न्होते म्हणुन गोही लटीके होउन ।। जें गुन्याव सांगीतलें ।। तें बुधी सारीखें न्होतें ।। म्हणून लटीकें गोही जाहालें ।। छ ।। ह्याबदल जेजु तारकाच्या वचनामधें गुन्याव दिसायाला ।। जुदेवांच्या गुरुनें स्वामीयास देवावर आण वाहीलें ।।छ।। ऐसें म्हणुन पुशलें ।। तुं सत्यवंत देवाचा-पुत्र क्रिस्त म्हणायाचा होये ।। कीं नाहीं ।। तर अम्हांस सांग ।। छ ।। तदवां जेजु स्वामी होये ।। अम्हीं देवाच्या उजवे हातीं बैसुन ।। अणीक परलोकींतुन मानतुवांनी येतानां ।। तुम्हीं अम्हांस बगाल म्हणून सांगुन ।। गुरुला प्रति उतर दिलें ।।छ।। हें प्रति उतर जुदेवांचा गुरु ऐकुन ।। अपलीं वस्त्रें फाडीलीं ।। अणीक हजीर असल्या शास्त्रीयांस बगुन ।। देवदुषण बोलीला कीं ।। अणीक गोही कैशास ।। तुम्हांस काये दीस्तें म्हणुन ।। त्यां शास्त्रीयांस पुशलें ।। ते समस्त ।। ह्या मरणास प्राप्ती ।। म्हणुन सांगीतलें ।।छ।। ह्या उपर ।। त्या रात्रीमधें जेजु स्वामीयान त्या गुराच्या घरात सोशील कष्ट ।। दुषण ।। मस्कऱ्या आगणीत म्हणुन ।। सांगवत नाहीं ।।छ।। कोण चाकर मारीतो ।। कोण मुखीं थुंकीतो ।। वेड्याला करीत्यात तैसें ।। स्वामीच्या डोळयांवर चीरकुट बांधुन तपराक मारून ।। तुला कोकोणी मारीलें ।। म्हणुन पार्खुन अम्हांस सांग ।। म्हणुन पुसत होते

अनुक्रमणिका

।।छ।। त्यामधें ।। श्रेष्ट शीश रायानाथु ।। स्वामीयास काय करत्यात म्हणुन समजायाला ।। नेणत्यासारखें ।। त्यां लोकांमधें गुरुच्या घरांत शीरला ।। तदवां येकान ।। रायनाथाला बगुन ।। तुं ह्याचा शीश म्हणुन सांगीतलें ।। रायनाथाने ।। मीं न्हवे म्हणुन सांगुन ।। प्रति उतर दिलें ।।छ।। ऐसें तीनीदांव ।। जेजुचा शीशु न्हवे म्हणुन ।। सांगीतल्या उपर ।। कोंबड्याने दुसऱ्यान साद घातले ।। दुसरे दांव कोंबडा साद घालीतांच ।। स्वामीयान त्याच रात्रीमधें सांगीतलें तें वचन आठव झालें ।।छ।। म्हणजे त्या ब्रेहस्पतीवाराच्या पवीत्र रात्रीमधें ।। अपणास काये येईल म्हणुन समजुन ।। तें अदीं शीशांस सांगीतलें ।।छ।। म्हणजे तुम्हीं अम्हांस सोडून पळून जाल ।। जदवां रायनाथानें ।। अपणास कीतुकी प्रीती होती म्हणुन दावायाला ।। स्वामीयास ऐसें सांगीतलें ।। अवघे तुम्हांस सोडुन जातील ।। तर अम्हीं तुम्हां संगाती ।। पाहीजे असलें तर ।। प्राण देउं ।। तुम्हांस नेणों ।। सांगणार नाहीं ।। म्हणुन जे तुला सांगीतलें ।।छ।। तदवां स्वामीने रायनाथाला ऐसें सांगीतलें ।।छ।। कोंबडा दुसरेंदां साद घालायाच्या अदीं ।। तुं तीनदां अम्हांस नेणेस म्हणुन सांगशील ।। स्वामीयान दुरदृष्टीने बगुन ।। रायाजीला सांगीतलें ।।छ।। तें वचन त्या कोंबड्यास मदीं रायाजी आठवण करून ।। गुरुच्या घराबाहीर निगुन ।। बहुथोर दुखीन रडुं लागला ।। अपला सत्यवंत देव गुरुमाणुसाच्या भ्यानें वळखत नाहीं सागीतलें म्हणुन ।।छ।। ह्यामधें अम्हांस बुधी येयाला ।। म्हणजे आकांत समई पापांत पडानां होयाला ।। पापाचा समय आहे तर ।। असल्या समयामधे ।। जाग्यामधें शीरूं नये ।। राहुं नये ।।छ।। अणीक देवाच्या मना आडवें कोणी पाप केलें तर त्या पापांत थांबनास्तां ।। पाप मोडुन ।। देवाला चुकलों म्हणुन ।। आठव करून उदंड दुखीन रडुन ।। देवाजवळ पापाचें नीवारण मागावें ।। छ ।। भक्त रायनाथु पापांत पडला तदवां मात्र रडला नाहीं ।। पण जीव होता परीयंत्र ।। तें पाप आठव करून ।। दुखीन रडला ।।छ।। आम्ही तैसेंच अम्हांचें पाप निवारणा होयाला ।। देवाजवळ दया मागुन ।। सदां दुखीन रडावें ।। छ छ छ छ छ

## ।। आठवें तेज ।।

### ।। जुदेवां वैऱ्यांनी जेजु स्वामीस पीलाताच्या घरास मनसुभीस न्हेले म्हणुन वर्तमान सांगुन दाखवीतें ।।

शुक्रवार दिवस उगवल्या उपर ।। जेजु स्वामीयाचे वैरी मेळुन ।। स्वामीयास जीवीं मारायाला पीलाता शैनापतीजवळ बांधुन न्हेलें ।।छ।। हा माणुस अम्हांजवळ आणीला कां ।। म्हणुन पीलातानं वैरीयांस पुशलें ।।छ।। हां बहुवाईट माणुस जुदेय

धरून हेथ पावतें ।। अपण राजा म्हणुन लोकांस घाब्रे करून सांगत येतो म्हणुन ॥ वैरीयांनीं स्वामीयावर गुन्याव घालुन।। पीलातास जाब दिलें ।।छ।। तदवां पिलालाने स्वामीयास पुशलें ।। तर तुं राजा कीं ।।छ।। पिलातास स्वामीयाने जाब दिलें ऐसें ।। अम्ही राजा म्हणुन तुं सांगतोस ।। पण माजें राज्यें ह्या सौंसाराचें झालें तर ।। अम्हंची प्रजा मेळुन ।। झगडुन ।। सोडवीतील ।। म्हणुन स्वामीयान प्रति उतर दिलें ।।छ।। स्वामीयाचे वैरी स्वामीयावर आदीक आदीक गुन्यांव सांगत होते ।। स्वामी काहीं सांगनास्तां उगेच होते ।। म्हणुन शैनापती बगुन ।। त्यास आश्चर्य दिसुन ।। स्वामीयाला दुसऱ्यानें सांगीतलें ।। हे तुजवर बहुत गुन्याव सांगत्यात कीं ।। तुं त्यांस आड काहीं सांगनास कीं ।। तुलां सोडायाला ।। अणीक गुन्यांव खरें करायाला।। अम्हांत हुकुम आहे म्हणुन नेणेस ।। तदवां त्याला स्वामीयानें सांगीतलें ।। तुला अम्हांवर काही हुकुम म्होतें होईल ।। परलोकींतून सर्वेश्वरान अम्हांवर तुला हुकुम दिलें नाहीतर ।। तुज्या हुकुमाखालीं अम्हच्या वैऱ्यांनी अम्हांस वोचुन दिलें ।। त्यांस पाप आदीक ।। म्हणुन स्वामीयाने पिलातास जाब दिलें ।।छ।। हें पिलात ऐकुन ।। अपणास बहुशें दिसलें ।। स्वामीयावर गुन्याव नाहीं म्हणुन नीश्चय केला ।। अणीक सोडायाला उपाय बगीत होता ।। छ ।। ह्याबदल ।। बंदखानीत असल्यां गुन्यावकारांमधे ।। पास्कव जातरेमधें तदवां जुदेवांस ।। मागीतला त्यो ।। सोडायास रीत होती ।।छ।। त्या गुन्यावकारांमधें ।। बरबास म्हणायाचा येक थोर गुन्यावकार होता ।। म्हणुन जुदेवांस पिलातान पुशलें ।। तुम्हांस पास्कव जातरेस ।। येक गुन्यावकार सोडायाला रीत आहे कीं ।। तर कोणास सोडावें ।। बरबास कीं जेजु ।। म्हणुन त्यांजवळ पुशलें ।। छ ।। तर त्यांनी बरबास सोडावे म्हणून सांगितले ।। छ ।। जेजुला काये करावें म्हणुन वैरीयांजवळ पिलाताने पुशलें ।। छ ।। शीलव्यावर जोडून मारा ।। मारा ।। म्हणुन वैऱ्यांनी बोंबकरून सांगीतलें ।। तदवां पिलात ।। तुम्हांच्या राज्याला शीलुव्यावर जोडुं काय ।। त्यावर काहीं गुन्यांव अम्हांस दिसत नाहीं ।। तुम्हीं त्याला जोडा ।। म्हणुन पिलतान वैऱ्या जुदेवांस प्रतिउतर दिलें ।। छ ।। अम्हांस जोडायाला ।। वेदाप्रमाणी होईना ।। तुम्हीं जोडावा ।। अपण सर्वेश्वराचा पुत्र सांगीतलें म्हणुन ।।छ।। तुम्हांच राजा शीलुव्यावर जोडुं काय ।। म्हणुन पुशलें ।।छ।। त्यो अम्हांचा राजा न्हवे ।। त्याने ।। अपण राजा म्हणुन ॥ सांगीतले ।। तुम्हीं सोडीतों जर ।। शेजर म्हणायाच्या पात्छावाला घातकी होयाला म्हणुन ।। त्यास भें दाखउन सांगीतलें ।।छ।। वैऱ्यांस स्वामीयावर काकुळती येउन सोडायाला ।। जेजु तारकाला जेरबंदानी मारायास सांगीतलें ।। ह्या फरआणा प्रमाणी ।। चाकरे स्वामीयास खांबासी बांदुन ।। आंगाचें वस्त्र काडुन ।। पांच हजार

न. भा. २

आदीक मारीलें ॥ शरीर अवघें घाये झालें ॥ रग्त वाहुन भोईं भिजली ॥छ॥ त्या उपर स्वामीयाच्या पवित्र मस्तकावर थोरकांटयाचा मुकुट बळाने ठेउन ॥ कीतुके कांटे हुोते ॥ ईतुके रग्ताचे झरे वाहवले ॥ जुनी सकलात नेसायास देउन ॥ हातांत देवनळ देउन ॥ तारकाला मस्कन्यांचा राजा दिसायास केला ॥छ॥ ह्या रूपानें पिलाताने जेजु तारकाला जुदेवांस ऐसें सांगुन दाखवीलें ॥छ॥ हे गे माणुस तुम्हांचा राजा ॥ म्हणजे असल्या माणुसास माणुसाचें ॥ राज्याचें रूप नाहीं ॥ तर त्यावर काकुळती होउन सोडवा ॥ छ ॥ असलें वचन वैरी ऐकुन काडाकडा शीलुव्यावर त्याला जोडा ॥ म्हणुन जुदेवांनी बाब करून पिलातास सांगीतलें ॥छ॥ तदवां शैनापती पिलातु[ने] समस्तांस हजीर ऐसें सांगीतलें ॥ मला ह्या पुंन्यादिकावर गुन्याव नाहीं म्हणुन ॥ तुम्ही समजा ॥ हात धुहुन सांगीतलें ॥छ॥ जुदेवांनी त्याचे रग्त ॥ म्हणजे स्वामीयाचें मरण अम्हांवर ॥ अम्हांच्या पुत्रांवर येऊं म्हणुन अपणास श्राप त्यांनी घातला ॥ छ छ छ छ छ

## ॥ णौवें तेज ॥

### ॥ स्वामी कष्ठल्याचें वर्चील वर्तमान सांगुन दाखवीतें ॥

शैनापती पिलाताने ॥ जुदेवांच्या मनासारीखें ॥ स्वामीयास शीलुव्यावर जोडायाला फरमाण लीहुन दिलें ॥छ॥ थोर विरुक्षाचा शीलुवा वैरी मुस्तैदकरून होते ॥छ॥ तो जेजु स्वामीयाच्या खांद्यावर ठेउन ॥ शाराबाहीर होता कालवारीये डोंगरावर जोडायाला स्वामीयास न्हेले ॥छ॥ शीलुव्याचा भार थोर ॥ स्वामीयाचें नित्राण बहुत ॥ म्हणुन भाराने वाटेवर पडत जात होते ॥छ॥ ह्या कुतीं कालु-वारीय डोंगरास पावायाच्या अर्दी स्वामी मरतील म्हणुन ॥ जुदेवांस भें टिसलें ॥छ॥ ऐसें तर ॥ ईतुकी शास्त्री ॥ अपमान दिसना होईल ॥ म्हणुन शीलुव्यावर जीवीं जोडायाला ॥ स्वामीबराबर शीलुवा न्हेयाला येक मजुरदार केला ॥छ॥ मार्गावर जातानां ॥ येकी पुन्ये आस्त्रीने ॥ स्वामीयावर काकुळती होउन ॥ भक्तिन नितळ रूमाल घेउन ॥ स्वामीयाचें पवित्र मुखकमळ पुशीलें ॥छ॥ त्या रूमालास स्वामीयाच्या पवित्र मुखकमळाचें रूप लागलें ॥ अपल्या कष्टाचें आठवण अम्हांस होयाला ॥छ॥ अणीक पुण्ये आदिकया स्वामीयास बगुन ॥ उदंड रडायास लागलीय ॥छ॥ तीयांस स्वामीयाने ऐसें सांगीतलें ॥ अम्हांवर तुम्हीं रडुं नकां ॥ पण तुम्हांवर ॥ तुम्हांच्या पुत्रांवर रडा ॥ वोल्या लाकुडास ऐसें वीस्तो लागतो तर ॥ वाळल्यास कैसें लागल म्हणजे सत्यवंत देवाच्या पुत्राला ॥ माणुसांचीं पापें फारीक करायाला ॥ अखंडीत नीतीची अग्नी त्याला लागुन ॥ ऐसें ईतुकें जळलें

अनुक्रमणिका






तर पापी वाळल्या लाकुडासारीखें ।। त्यांस अखंडीत नीतिची त्यांस शास्ति लागुन ।। कैसें जळतील म्हणुन अर्थ होउं ।।छ।। जेजु तारक कालवारीस डोंगरावर पावले ।। पावतांच ।। शीलुवावर त्यांस नीजविलें ।।छ।। दोनी हातांस दोनी लोखंडाचे खीळे ।। दोनी पायांस येक होउहुन ।। आम्रुत येजु तारकाला निष्ठुरांनी शीलुव्यावर जोडीले ।। जोडीतांच ।। उभा नीट उचलून ।। शीलुव्यावर जोडील्यां दोगां चोरांमध उभे केले ।।छ।। स्वामीयास जोडीले तदवां दोन प्राहार झाले ।। ग्राहणसमये नास्तां ।। सुर्याला प्रकाश नाहीं होउन ।। अवघा संसार आंदकार झाला ।। धोंडे येक येकास आदळुन फुटले ।। भोई सर्व ठाई गर्जली ।। थोर देउळाचा पडदा वरने घरून खालीं पावेतो फाटला ।। मेले ते उदंड लोक जीवंत होउन ।। शारामधें चालुन ।। द्रिष्टी पडले ।।छ।। संसाराचे धणी मेले म्हणुन ।। अवघा संसार दुखीष्ट झाला ।।छ।। माणुसें ते बगुन ।। उरावर मारून ।। पापाचें बकसणें देवाजवळ मागीतलें ।।छ।। स्वामीयास राखत होता हवालदार ईतुकीं नवले बगुन ।। हा माणुस सत्यवंत देवाचा सत्यवंत पुत्र म्हणुन सांगीतलें ।।छ।। दुर मुलकांत होता थोर ज्योंतीश शास्त्रीं दियांनीजी अखंड उपजीत म्हणायाचा ईतुकीं नवलें बगुन ।। संसार सरतो तर ।। संसाराचा रचणारा कष्टतो तर ।। म्हणुन आभीष्ट होउन सांगीतलें ।।छ।। दोगां चोरामधें स्वामीयास शीलुव्यावर उभे केले म्हणुन सांगीतलें कीं ।। त्यां दोगांमधले येक ।। स्वामीयास शीव्या देउन ।। दुशणें सांगत होता ।। उजवे बगलेस होता त्यो त्याला आगराउन ऐसें म्हटलें ।। तुला देवाचें भें नाहीं कीं ।। अम्हीं अम्हांच्या पापांसारीखें कष्ट भोगीतों पण ह्यानें काये वाईट केलें ।। म्हणुन अणीका चोराला सांगीतलें ।। छ ।। जेजु तारकाळा बगुन ।। स्वामी ।। तुम्ही तुम्हंच्या राज्यांत पावाल तदवां ।। माझें आठवण करा ।। म्हणुन विनंती करून सांगीतले ।। छ ।। तदवां स्वामीयाने ।। आज अम्हा संगातीतले मोक्षास जाशील ।। म्हणुन बऱ्या चोराला सांगीतलें ।। छ ।। स्वामीयावर भक्ति ।। विस्वास ।। भरवंसा ठेवीलें ।। पापाचे थोर दुख मनांत ठेउन ।। अपणास देवाची दया पावली ।। छ ।। जुजे घातकी अपलें पाप वळखुन ।। सत्यवंत गुरूला पापीयांच्या हातांत दाउन दिलें म्हणुन आठव करून ।। घेतले तीस रुपय ३० ।। जुदेवांस परतुन देउन ।। अपण पुंण्यादिकांचे रगत दाउन देउन ।। पाप केलें म्हणुन सांगुन ।। आभरवंसा होउन ।। येक विरुक्षावर गळफांस घेउन ।। नरकास गेला ।।छ।। स्वामी जेजुचा शीश जुदाला ।। अणीक चोरला ।। ईतुकें आंतर झाले ।।छ।। चोर ।। अपण पापी म्हणुन वळखुन ।। मनांत दुख धरून ।। स्वामीयावर भक्ति ।। विस्वास ।। भरवंसा होउन ।। चुकलां म्हणुन ।। स्वामीजवळ दया मागुन ।। मोक्षास पावला ।। जुदस[नें] अपलें पाप वळखीलें ।। तर पापाचें बक्षणें मागनास्तां ।।

आभरवंश्यान नरकांत पडला ||छ|| तर तुला कितुकीं पापें अटसलीं तर || दुखीन || दाक्षणान || देवावर भरवंसा होउन || बकसणें मागीतलें तर || देईल || छ || ह्या कुर्ती शीलुव्यावर जोडुन मेले म्हणुन खरें करावें ||छ|| बकसीलें नाहीं तर || अम्हांच्या गुन्यावान || त्यास सदां अपरांपर दया || नीति आहे || छ || तीनी तास शीलुव्यावर || माणुसांच्या पापा कुर्ती || अम्हांचा मोवाळ जेजु तारक जिवीं होते || त्यांजवळ सदांपरी सुद कनिका मरीय माता उभी राहीली || अणीक वेगळीया पुण्या आस्त्रीया संगाती || शीशांमधले येकच || जेजुचा मोवाळ कुपाजी ||छ|| कुपाजीला स्वामी शीलुव्यावरने बगुन || हेगे तुजी माय म्हणुन || सदां कनिके मरीय मातेला दाखउन || सांगीतलें ||छ|| सदां परीसुद कनिके मरीये मातेला स्वामी बगुन || हेगे तुजा पुत्र म्हणुन || कुपाजीला दाखउन || सांगीतलें ||छ|| जदवां कुपाजीला परी सुदकनीका मरीय माता म्हणुन स्वामीयान सांगीतलें || तदवां अम्हां समस्तांस माय केली || अम्ही तियावर मया || भवित ठेउन || असलीया देवमातेच्यां पुत्रांसारीखें पुन्ये वाटेवर चालुन || तिला विनंती करावी ||छ|| अणीक कितुक्या आकांतात अम्हीं पडलोंतर तीचा भरवंसा सोडुं नये || छ छ छ

## || चौउता भाग ||

## || धाहावें तेज ||

### || जेजु स्वामीच्या मरण्याचें वर्तमान दाखवीतें ||

वैरीयां माणुसांनी || स्वामीयास ईतुकें कष्टउन || शीलुव्यावर जोडुन दिलें कीं || तर स्वामी दावा || राग काहीं ठेवीनास्तां || त्यांवर दया होउन अपल्या अनादी पित्याजवळ त्यांस पापाचें बकसणें || ऐसें म्हणुन सांगुन मागीतलें || पित्या हें काये करीत्यात || त्यांस कळत नाहीं || त्यांस बकसा || म्हणुन विनंती केली ||छ|| ईतुकीं दयां अम्हांच्या तारकाला माणुसांवर होती || अणीक आहे ||छ|| शेवटीं || उबंड शब्दाने अपल्या देव पित्यासी बोलुन || अम्हंचा आत्मा तुम्हंच्या हातांत देतों म्हणुन सांगुन || मरण पावले ||छ|| स्वामी जेजु कीस्तु[नें] देव पित्याला जय || विनंती केली || मरण पावले म्हणुन ऐकतांच || माणुस सूभावा पासने म्हणुन समजावे ||छ|| म्हणजे जेजु तारक सत्यवंत देव || सत्यवंत माणुस होय कीं || तर सत्यवंत देवा पासने देवपीत्या सारीखा देव || म्हणुन विनंती करीत नाहीं || अणीक मरत नाहीं || माणुस भावापासन || सर्वेश्वराने रचीली वस्त || म्हणुन सारीखा म्हवे || तर माणुस सभावा पासने विनंती केली

कीं ||छ|| अणीक मरण पावले ।। म्हणजे आत्मा शरीराबाहीर नीगाला || देवपण तर || सदां कुडीला || आत्म्याला येकवटुन होतें ।। कदीं तोडीलें नाहीं म्हणून खरें करावें ।।छ|| मेल्या उपर || येक चाकर भाला घेउन || बर्कळीस भाल्याने शीख मारीली ।।छ|| त्या घायांतुन रग्त || अणीक पाणी निगालें ।।छ|| आदीकनाथ म्हणायाचा येक थोर उमरावु जेजु तारकाचा शीश शैन्यापती पिलाताजवळ जाउन ।। स्वामीयाचें शरीर शीलुव्यावरने काढुन || पुरायाला ।। रजा मागीतली || पिलाताने रजा दिली ।।छ|| त्यो शीश अणीकां शीशांसंगाती शीलुव्यावरने पवीत्र शरीर उतरुन || त्या विलातीचीया रीतु प्रमाणी ।। बहुमोलाचें परमळीक तैल घेउन || शरीरास लाउन ।। धोंड्याच्या नव्या समादींत ठेउन पुर्लें ।। येक थोर धोंडा झांकणें लावीलें ||छ|| जेजु तारकाच्या वैऱ्यांस हें न पुरे होउन || यचरीक्यान पीलाताजवळ रजा मागुन || समादीला शीका लाउन ।। चाकरांस राखायास लावीलें ।।छ|| जेजु तारक शुक्रवार दिवशीं मेले ||छ|| मरतांच ।। त्याचा आत्मा देवपण देखील पाताळांत उतरला ।।छ।। म्हणजे भोईत च्यार पाताळ आहेत ।। समस्तांवर आहे तें ।। श्रेष्ठ पुर्वल्या पुण्यादिकां पुरुषांचें पाताळ म्हणुन सांगतों ||छ|| म्हणजे जेजु तारक मरण पावायाच्या अदीं ।। जे कोण देवाच्या कृपेमधें मेले होते || ते आदी पुरुषाच्या पापा कृतीं || मोक्षास जावत नाहीत || म्हणुन सर्वेश्वराने त्यांला त्यो जागा जेजु तारक मरे परीयंत्र ।। नेमीला ||छ|| जेजु तारक मरतांच ।। त्यांला द्रिष्टी पडुन ।। ते मोक्ष भरीत झाले ||छ।। दुसरा जागा न्हान लेंकुवांचा जागा म्हणुन सांगतो ।।छ|| म्हणजे जीं कोण न्हान मुलें || आगळें उणें सात ७ वरुषां परीयंत्र बुधी नाहीं होउन ग्यानस्नानावीण मरत्यांत || त्यांस दुसरें पाताळ ।। ग्यानस्नानावरउन येती देवाची कृपा नाहीं || म्हणुन मोक्षास जावत नाहीत || पाप || पुंन्ये बरें करून वळखायाला बुधी नाहीं म्हणुन || कर्म पाप नाहीं ।। म्हणुन नरकास जावत नाहीत ।। आदी पुरुशाचें जन्म पाप ग्यानस्नान निगुन जातें ।। तें पाप आहे म्हणुन मोक्षास जावत नाही || त्यां लेंकुवांस सर्वेश्वरान दुसरा जागा तेथें मोक्ष || नरक ।। भोगुं नास्तां || राहायाला दिला ||छ।| तीसरा जागा उधरायाचा जागा म्हणुन सांगतों ||छ|| म्हणजे जे कोण देवाच्या कृपेमधें मरत्यात ।। त्यांला अल्प पाप आहे तर || पापाकृतीं ह्या संसारांत सारीखें उधरीलें नाही || तर त्या तीसऱ्या जागांत पापासारीखें फारीक करून मोक्षास जात्यात || त्या जाग्यांत वीस्त्याचें कष्ट || अणीक सर्वेश्वराचीया नीती-प्रमाणी देवावर मयां ठेउन || सोसुन भोगत्यात || म्हणजें मोक्षास जायाला || पापाचें शुध्ध नीतळपणा होवें ||छ।। तीसऱ्या जागाखालीं चौता जागा नरक ||छ|| त्यांत भुतें आहेत || म्हणजे भुलोक ।। परलोक आरंभल्या धनें देवदुतांमधले बहुत ।।





हांकाराबदल नासुन ।। सर्वेश्वराने त्यांस नरकांत घातलें म्हणुन ॥ दुसऱ्या भागांत सांगीतलें कीं ।। तीं भुतें नरकांत आहेत ।। अणीक जे कोण ।। सर्वेश्वराच्या वेदाप्रमाणी ।। सर्वेश्वर मात्र देव म्हणुन वळखनास्तां ।। अणीक देव आहेत म्हणुन चींतुन ।। असल्यांस नमस्कार ।। पुजा करीत्यात ।। ह्या अग्नानामधें मरत्यात ।। तर ते नरकास जात्यात ।।छ।। अणीक जे कोन सर्वेश्वराचे सत्य कृपावेद घेउन ।। थोर पापामधें मरत्यात ।। ते नरकास जात्यात ।। सर्वेश्वराच्या वेदाप्रमाणी ।। पापाचें नीवारण केलें नाहीं म्हणुन ।। तेथें सर्व कष्ट भोगुन ।। सदां सर्वदा तेथेंच राहातील ।। छ ।। मोक्षास जात्यात ते ।। तेथें सर्व सुख सदांसर्वदा भोगुन ।। सर्वेश्वराच्या सन्मुखी राहातील ।। छ छ छ



---



अनुक्रमणिका

डॉ. गणेश थिटे

# दासोपंतविरचित पुरुषसूक्तार्थप्रकाशः

## ( ग्रंथपरिचय )

दासोपंत गोस्वामी हे आंबेजोगाई (मोमिनाबाद) येथील राहणारे व त्यांचे मराठीसाहित्यातील स्थान महत्त्वाचे आहे हे सर्वज्ञात आहे. त्यांनी संस्कृत-भाषेतही पुष्कळ साहित्यनिर्मिती केली आहे व तिचा अभ्यास होणे आवश्यक आहे. त्यातील अद्वैतश्रुतिसागरः, सिद्धराजागमः ह्या सारखे ग्रंथ, तसेच दशोपनिषद्-भाष्ये, विविध स्तोत्रे इत्यादी प्रकारची त्यांची संस्कृतरचना आहे. ऋग्वेदातील पुरुषसूक्त (१०.९०) त्यांनी पुरुषसूक्तार्थप्रकाशः (अण्णाजी गोसावी, नागपूर, १९५४) हा विवरणात्मक ग्रंथ लिहिला असून त्याचा ह्या लेखात थोडक्यात परिचय करून देण्याचे योजिले आहे. अण्णाजी गोसावी ह्यांच्या आवृत्तीचा सदर लेख लिहिताना फार उपयोग झाला ह्याचा कृतज्ञतापूर्वक निर्देश करीत आहे.

दासोपंतांच्या मतानुसार सर्व जगत्कारण अशा, सर्वासर्वरूप अशा परमात्म्याचे वर्णन पुरुषसूक्तात केले आहे. पुरुषसूक्ताची सोळा ही ऋक्संख्या, नारायण हा ऋषी, पुरुष ही देवता इत्यादी प्रास्ताविक माहिती सांगून मग दासोपंतांनी भाष्यास प्रारंभ केला आहे.

### परमात्मा

पुरुषसूक्तात पुरुषाचे सहस्रशीर्ष, सहस्राक्ष, सहस्रपात् असे वर्णन केले आहे (ऋ. १). सर्व प्राणिमात्रांचे मस्तक वगैरे जे अवयव ते सर्व ह्या पुरुषाचेच समजावेत. म्हणजे मग त्याला सहस्राक्ष इत्यादी का म्हटले ते कळेल. कारण तो परमात्मा "बहु स्यां प्रजायेय (मी खूप होईन, जन्म देईन)" अशी इच्छा करून, सर्व शरीरे निर्माण करून त्यांच्यातच शिरला आहे. तो परमात्मा हे सर्व विश्व व्यापून दहा अंगुले अधिक उरला आहे. भुवईच्या मध्यापासून ब्रह्मरंध्रापर्यंतचे अंतर दहा बोटे असते. सृष्टीच्या आरंभी परमात्म्याचा जीवरूपाने त्याच मार्गाने

अनुक्रमणिका







अनुप्रवेश होतो आणि त्याच मार्गाने मोक्षप्राप्ती होते. समाधीच्या वेळीही तेथेच अवस्थिती असते. ते स्थान ओलांडून हा परमात्मा राहिला आहे. भूतकाळात जे नामरूपकर्मादिक झाले, जे वर्तमानकाळात आहे व जे भविष्यकाळात होईल ते सर्व हा परमात्माच आहे. तोच मोक्षाचाही दाता आहे. जे अन्नाने वाढते त्याचाही तो ईश आहे. अशा प्रकारे तो परमात्मा उत्पत्ती, स्थिती व लय ह्यांचे कारण आहे. त्याचे मोठेपण एवढे आहे. त्यामुळे तो फारच श्रेष्ठ आहे. तो प्रणवाने ओळखला जातो; व त्यामुळे त्याचे तीन पाय आहेत ( प्रणवः ओंकार. त्याचे अ, उ, म हे तीन घटक ). स्थूल भूतांना अकार म्हणतात; तो त्याचा पहिला पाय. सूक्ष्मभूतांना उकाराने संबोधले जाते, तो त्याचा दुसरा पाय. ( तिसऱ्या पायाचा उल्लेख नंतर येईल ). अ–उ–म ह्या प्रकारचे त्रिपात्स्वरूप अमृतमय स्वर्गाच्या पलीकडे जाऊन राहिले आहे. तो त्रिपात्पुरुष कार्यगुणांशी संगत नसल्याने नित्यानन्दयुक्त असतो. उत्पत्ती व स्थिती ह्यांची व्यवस्था करून त्याने विक्षेपसंग टाकून दिलेले असल्यामुळे योगनिद्रेसाठी वर जाऊन राहिला. मग उपसंहारा-समयी निर्विकल्पावस्था सोडन देऊन मकाररूपी तिसऱ्या पायाची पुनःप्रवृत्ती होते. हे तीन पाय सत्त्व, रजस् व तमस् ह्या तीन गुणांचे निदर्शक आहेत. प्रलयाच्या वेळी श्रीरुद्र सर्वच भस्मसात करतो. त्यावेळी सर्वच भस्मीभूत होऊन आवरणजलात विलीन होते. मग ते जल स्वतःचे कारण असलेल्या तेजात, तेज वायूत, वायु आकाशात, आकाश अहंकारात, अहंकार अनुसंधान, ज्ञान, ज्ञेय ह्यांचा त्याग करून महत्तत्त्वात विलीन होतात. महत्तत्त्व निर्विकल्पस्फुरणाचा त्याग करून अव्यक्तात विलीन होते. अव्यक्त, ज्ञानाचा आधार घेऊन महामायेत विलीन होते. महामाया अवलंबाचा त्याग करून स्वगतत्त्वाने संक्रांत होते.

विराट पुरुषापासून जगाची सृष्टी –

तस्माद्विराट् ह्या ऋचेच्या भाष्यात जगत्सृष्टीचे वर्णन केले आहे. परमा-त्म्यापासून पञ्चभूतात्मक विराट् निर्माण झाला. विराज पासून ईश्वर, अभिमानी पुरुष, ब्रह्मा हा झाला. तो पुरुष सर्वसृष्टीहून अतिरिक्त होता. कारण तो सर्व सृष्टीचे कारण होता, त्याच्यापासून भूमी, शहरे इत्यादी गोष्टी निर्माण झाल्या. हा विषय भाष्यकारांनी पुढील प्रमाणे स्पष्ट केला आहे. जोवर प्रलयकाल होता तोवर एकटे ब्रह्मच होते. केवल सत्‌मध्ये योगनिद्रेने तन्मयत्वाने राहिलेला परमात्मा उत्पत्तीच्या वेळी स्वतःची आनंदमयता सोडून, स्वतःत विलीन झालेले प्रज्ञान घेऊन सविकल्प झाला. ही शब्दापासून शबलाची उत्पत्ती. त्याच्यापासून अव्यक्त तत्त्व निर्माण झाले. अव्यक्तापासून महत्तत्त्व. जे निर्विकल्प असे प्रपंचस्फुरण

असते तेच अध्यासाने सविकल्प होते. तोच अहंकार. तो महत्तत्त्वापासून निर्माण होतो. हा अहंकार तीन गुणांचा असतो. सात्त्विक, राजस व तामस. सात्त्विकामधे ज्ञानशक्तीचे प्राधान्य असते; म्हणून त्याच्यापासून पाच अन्तःकरणे निर्माण झाली. राजसामध्ये क्रियाशक्तीचे प्राधान्य असते; म्हणून त्याच्यापासून कर्मेन्द्रिये आणि ज्ञानेन्द्रिये निर्माण झाली. तामस अहंकारात द्रव्यशक्तीचे प्राधान्य असते. म्हणून त्याच्यापासून पाच सूक्ष्मविषय निर्माण झाले. त्यापासून भूतपञ्चक झाले, ते पुढीलप्रमाणे– शब्द हा एकच गुण असलेले आकाश; शब्द व स्पर्श हे दोन गुण असलेला वायु; शब्द, स्पर्श, रूप हे तीन गुण असलेले तेज; शब्द, स्पर्श, रूप व रस हे चार गुण असलेले पाणी; आणि शब्द, स्पर्श, रूप, रस व गन्ध हे पाच गुण असलेली पृथ्वी. मग मातीच्या चिखलातून ब्रह्माण्ड निर्माण झाले. मग परमात्म्याने त्यात अग्निरूपाने प्रवेश करून स्वतःच्या तेजाने तो चिखल शोषून, स्वतःपासून वायु निर्माण करून त्याच्या तिर्यग्गतीच्या साहाय्याने आतून पोकळ असे हे ब्रह्माण्ड निर्मिले. मग सृष्टीच्या विस्तारासाठी तो त्या सृष्टीत स्वतः शिरला. त्याने स्त्रीपुरुषांच्या स्वरूपात देव, माणसे वगैरे निर्माण केली.

अशा प्रकारे सृष्टीची निर्मिती करून झाल्यानंतर पुरुषाला स्वतःचे शरीर टाकून देण्याची इच्छा झाली. मग सृष्टीला भोग आणि मोक्ष मिळावा ह्यासाठी त्याचे साधन असलेल्या यज्ञरूपी कर्माची स्तुती करण्यासाठी त्या पुरुषाने स्वशरीर मेध्य बनवन देवाकडून यज्ञ करविला हे पुढील ऋचांत सांगितले आहे. अशा प्रकारे ऋचांची संगती भाष्यकारांनी लावली आहे.

## देवांनी केलेला यज्ञ

देवांनी केलेल्या यज्ञात पुरुष हाच हविर्द्रव्य होता. त्या यज्ञात वसंतऋतू हा आज्य होता. आज्याने हविर्द्रव्य स्निग्ध होते. वसंत ऋतूमुळेसुद्धा पत्रपुष्पादींची समृद्धी होऊन सर्वत्र स्निग्धता येते. त्या यज्ञात ग्रीष्म ह्या ऋतूचा समिधा म्हणून उपयोग केला गेला. कारण ग्रीष्मात उष्णता फार असते. शरदृतू हा हवि होता. कारण शरद्ऋतूमध्ये धान्याची उत्पत्ती होते. यज्ञरूपी त्या पुरुषाला देवांनी दर्भावर प्रोक्षित केले. त्याच्या योगाने देवांनी यज्ञ केला. तो बघून साध्य नावाच्या ऋषींनी, व विद्वान् ऋषींनी यज्ञ केला. त्या सर्वहुत यज्ञातून ते आज्यमिश्र दही एकत्र केले गेले त्यापासून वायव्य ( म्हणजे पक्षी ) तसेच रानटी व गावातील असे पशू निर्माण झाले. गाय वगैरे पशूंच्या निर्मितीच्या आधी आज्यमिश्र दही कुठून आले ह्या प्रश्नाला "आधीच्या सृष्टीच्या अनुस्मरणाने स्वसंकल्पाने हे सर्व निर्मिले" हे उत्तर आहे.

त्या सर्वहुत् यज्ञापासून पुनः आहुती टाकण्यास साधन असलेल्या ऋचा व साम त्यांच्याबद्दलचा संकल्प केल्याबरोबर निर्माण झाली. गायत्री वगैरे छन्द आणि यजुर्वेद हेही निर्माण झाले. मग घोडे तसेच ज्यांना खाली व वर दात असतात असे आणखीही इतर उंट, गाढव इत्यादी प्राणी निर्माण झाले. मग गाय, बैल, बोकड, शेळ्या निर्माण झाल्या. पुरुषाचे मोठेपण सांगण्यासाठी हे सर्व वर्णन केले गेले आहे.

ज्या पुरुषाच्या योगे देवांनी यज्ञ केला त्याच्याबद्दल देवांनी कोणकोणत्या प्रकारे विकल्प केले ? त्याचे मुख कोणते, बाहू कोणते, मांड्या कोणत्या, पाय कोणते असा प्रश्न निर्माण झाल्यावर पुढील प्रमाणे उत्तरे आहेत अशी संगती भाष्कारांनी लावली आहे.

सृष्टीच्या प्रारंभी स्वतःचे कारण असलेल्या सर्वेश्वराहून अभिन्न असलेल्या पुरुषाचे ब्राह्मण हेच मुख झाले. अन्तःकरण ह्या सात्त्विक कार्याला कृती करण्यास साधनभूत असलेल्या वाणीचे मुख हे अधिष्ठान असल्याने ते सात्त्विक आहे. त्याच्यापासून निर्माण झालेले ब्राह्मणसुद्धा सात्त्विक गुणांचे प्राबल्य असलेले असतात. हातापासून क्षत्रिय झाला. सत्त्व आणि रजस् अशा दोन्ही गुणधर्मांनी युक्त असलेल्या मनाला कृती करण्याचे साधन आहे. म्हणून क्षत्रिय हे सत्त्व व रजस् ह्या दोन्ही गुणांनी युक्त असतात. बाहूचे कर्म म्हणजे दुष्टनाशन आणि शिष्टांचे प्रतिपालन करणे हे क्षत्रियांचे कर्तव्य आहे. तसेच मुखस्थानी असणाऱ्या ब्राह्मणाचे अन्नदानाने पालन हे त्याचे कर्तव्य होय. मांड्यापासून वैश्य झाला. रजस् व तमस् ह्या गुणांनी युक्त अशा मनाला कृती करण्यास साधनभूत होणाऱ्या शिश्नाशी त्यांचा संबंध आहे. वैश्यांनी जाणे-येणे ह्या प्रकारे व्यवहाररूप कार्य करावे. पायांपासून शूद्र झाला. पृथ्वी ही पुरुषाच्या पायाच्या जागी आहे. ती तमोमय आहे म्हणून तिच्यापासून जन्मलेले शूद्रसुद्धा तामस आहेत.

अशा प्रकारे द्रव्य, पशु, मंत्र व यज्ञकर्ते ब्राह्मण इत्यादी सांगितले. ह्या नंतर उपास्यदेवतांची उत्पत्ती सांगितली आहे.

मनापासून चंद्र झाला; डोळ्यापासून सूर्य; मुखापासून इन्द्र व अग्नी; प्राणापासून वायु हे निर्माण झाले.

नाभिस्थानापासून अन्तरिक्ष, डोक्यापासून स्वर्ग, पायांपासून भूमी, कानापासून दिशा; निर्माण झाल्या. मग लोक निर्माण झाले.

अनुक्रमणिका

ज्ञानयज्ञ –

चौदा भुवनेरूपी विराज् ह्या यज्ञपुरुषाच्या सात परिधी म्हणजे आवरणे आहेत. ब्रह्माण्डकवच हे एक, पार्थिव हे एक, पाणी वगैरे चार, तसेच अहंकार व अव्यक्त ही दोन. अशा प्रकारे सात परिधी ह्या यज्ञाच्या पुढील प्रमाणे एकवीस समिधा आहेत. पाच विषय; पाच कर्मेन्द्रिये, पाच ज्ञानेन्द्रिये, पाच प्रलयसाधने व एक कर्ता. प्रथम व्यतिरेकज्ञानाने परब्रह्म जाणावे. मग लयविक्षेपरूपी धूर नष्ट करून हृदयकमळ-रूपी कुंडामध्ये स्वप्रकाशाने व स्वसंवेद्यतेने अग्नी प्रदीप्त करून शुभेच्छादींनी भूमिका शुद्ध करून गुरूंच्या उपदेशानुसार त्यांच्या उपदेशातील अन्वयज्ञानविधानोक्त समिद्धोम करावा. विषय सेवनाच्यावेळी शब्दरूपी द्रव्य आत्मकामाज्याने माखून श्रोत्र ह्या द्वाराने अन्तःकरणासह आत्माकारतेने आत्म्यामध्येच "स्वाहा" म्हणून हवन करावे; हा शब्दहोम. अशाच प्रकारे स्पर्श इत्यादींचाही होम करावा. तसेच ज्ञानेंन्द्रिये, कर्मेन्द्रिये, पाच प्राण व कर्ता ह्यांचाही होम करावा. ह्या ज्ञानयज्ञाने कार्यकारण ह्या उपाधींनी निर्मित अशी सर्व सृष्टी ब्रह्माग्नीत हवन केली जाते. ह्या यज्ञाचे फळ मोक्षप्राप्ती हे आहे.

देवांनी यज्ञाच्याच साहाय्याने यज्ञरूपी परमात्म्याला उद्देशून यज्ञ केला. प्रलयाच्यावेळी परमात्म्याचे जे निर्गुणरूप ते व्यतिरेकान्वयज्ञानयोगाने सर्वांचा उपसंहार करणारे आहे. अग्नी त्याच्यापासूनच झालेला आहे. ह्यावर सांगित-लेल्या यज्ञात क्रियेला महत्त्व नसून ज्ञानाला आहे. पूर्वी अशा प्रकारची यज्ञकर्मे होती. आताचे लोकसुद्धा ज्ञान झाल्यावर आत्म्याच्या ठिकाणी अशी कर्मे करतात. तशी कर्मे करून देव स्वर्गाला पोचले ह्याचा अर्थ नित्यानन्दपद शुद्ध ब्रह्माची प्राप्ती त्यांनी करून घेतली. त्याच पदापाशी कपिल वगैरे आत्मज्ञानी राहतात.

अवलोकन–

वर दासोपंतांच्या पुरुषसूक्तभाष्यातील प्रमुख विचार दिले आहेत. त्यावरून पुरुषसूक्तविषयक आणि एकूण तत्त्वज्ञानविषयक अशी दासोपंतांची भूमिका काय होती हे कळण्यास मदत होईल. दासोपंतांचे हे भाष्य निरुक्त, व्याकरण, शब्दकोष ह्यांवर आधारलेले नसून तत्त्वज्ञानावर ( अद्वैत वेदांताच्या ) आधारलेले आहे. जरी पुरुषसूक्त, नासदीयसूक्त इत्यादी वैदिक सूक्तांमध्ये आपणास तत्त्व-ज्ञानाच्या उगमाचे प्रारंभिक अवस्थेतील दर्शन घडते तरी वेदकालातील तत्त्व-ज्ञानकल्पना ह्या अतिशय स्थूल, स्वैर व प्राथमिक दर्जाच्या आहेत. परंतु त्यांच्याच आधारावर आपण तत्त्वज्ञान सांगत आहोत असा बहाणा करीत पुढील काळातील प्रगत तत्त्वज्ञानात्मक विचार मांडले गेले आहेत. दासोपंतांच्या काळा-

पर्यंत वेदांतादी दर्शनांचा खूपच विकास झाला होता. त्या विकसित तत्त्वज्ञानातील काही विचारांचा पुरुषसूक्ताचे भाष्य ह्या रूपाखाली संक्षिप्त संग्रह असे दासोपंतांच्या पुरुषसूक्तार्थ भाष्याचे वर्णन करता येईल. त्यामागे "वेदार्थयत्न" करण्याचा उद्देश अर्थातच नाही. त्यामुळे वेदार्थयत्न ह्या दृष्टीने दासोपंतांचा पुरुषसूक्तार्थप्रकाश व त्यासारखे अन्य साहित्य ह्यांचे महत्त्व शून्य असून वेदान्तादिविचारांचे संग्रहग्रंथ एवढेच त्यांचे महत्त्व आहे. *

◆ ◆ ◆

---

* भारत इतिहास संशोधक मंडळाच्या ६० व्या संमेलनात दिनांक २ जून १९७३ रोजी संक्षिप्तपणे वाचलेला निबंध.







भास्कर लक्ष्मण भोळे

# आमची न्यायालये स्वतंत्र राहू शकतात काय?

दिनांक पंचवीस एप्रिल रोजी न्यायमूर्ती अजित नाथ रे यांची सर्वोच्च न्यायालयाच्या सरन्यायाधीशपदी नियुक्ती झाली. या घटनेने भारताच्या न्यायविश्वात खळबळ निर्माण झाली असून मतमतांतरांचे अभूतपूर्व वादळ उठले आहे. न्या. शेलात, न्या. हेगडे व न्या. ग्रोव्हर यांना डावलून ही नियुक्ती करण्यात आली आहे. ज्येष्ठताक्रमानुसार हे पद न्या. शेलात यांना मिळायला हवे होते. पण सर्वोच्च न्यायालयाच्या इतिहासात प्रथमच ज्येष्ठतेनुसार नेमणूक करण्याचा पायंडा मोडून चवथ्या क्रमांकावर असणाऱ्या न्या. रें ची सरन्यायाधीशपदी नेमणूक केली आहे. आदल्याच दिवशी जाहीर झालेल्या मूलभूत हक्कविषयक महत्त्वाच्या निर्णयात वरील तिन्ही न्यायाधीशांनी सरकारविरुद्ध भूमिका घेतल्या होत्या. आधीही काही प्रकरणांमधे त्या तिघांनी सरकारी निर्णय घटनाविरोधी ठरविले होते आणि या उलट न्या. रे यांनी सरकारधार्जिणी भूमिकाच बव्हंशाने घेतली होती, हा अेक योगायोगही (?) याप्रसंगी डोळ्यात भरतो. 'त्यांच्या प्रतिगामी विचारसरणीमुळेच त्यांना डावलले' असल्याचे सरकारच्या वतीने सांगण्यात आले आहेच. बॅ. विठ्ठलराव गाडगिळांसारखे शासनाचे 'पक्ष'पाती विधिज्ञ सोडल्यास देशभरच्या तज्ज्ञांनी व न्यायक्षेत्रातील माजी उच्चपदस्थांनी या कृत्याबाबत शासनाचा धिक्कारच केला आहे. काहींनी अत्यंत प्रखर शब्दात आपल्या प्रतिक्रिया व्यक्त केल्या आहेत. नुकत्याच सेवानिवृत्त झालेल्या न्या० सिक्रींना हा 'न्यायक्षेत्राच्या स्वातंत्र्यावर मोठा आघात' वाटतो. त्यात 'राजकारण गुंतल्यासारखे' दिसते. न्या. छगला, न्या. सेटलवाड, न्या. तारकुंडे, श्री. पालखीवाला इत्यादींनी पत्रकांद्वारे वा विविध व्यासपीठांवरून आपली परखड प्रतिकूल मते नोंदविली आहेत. संसदेत तर साम्यवादी वगळता सर्वच विरोधी पक्षांनी शासनावर टीकेचा नुसता भडिमार केला आहे.

प्रस्तुत लेखकाला वरील पैकी कोणत्याच बाजूचे समर्थन वा खंडन या लेखातून करायचे नाही. त्याचा अत्यंत मर्यादित हेतु आहे: रे यांच्या या

अनुक्रमणिका






नियुक्तीमुळे न्यायालयांच्या स्वातंत्र्यावर आकाशाची कुऱ्हाड कोसळली अशी जी भीती आज व्यक्त केली जात आहे ती खरोखरच आजच नव्याने निर्माण झालेली आहे काय? अशी नियुक्ती सर्वोच्च न्यायालयात आज प्रथमच झाली असली तरी अशा नियुक्तीची शक्यता आधीपासूनच नव्हती काय? घटनाकारांना न्यायालय स्वतंत्र असणे आवश्यक वाटत होते. घटना समितीच्या चर्चांमधून अशा स्वतंत्र्याची इष्टता प्रतिपादित झालेली अनेकदा आढळते. पण मग घटनाकारांनी हे अपेक्षित स्वातंत्र्य अबाधित ठेवण्याच्या दृष्टीने घटनेत कडेकोट बंदोबस्त केला आहे असे आपण म्हणू शकतो काय? – या प्रश्नांच्या अनुषंगाने विचार येथे अभिप्रेत आहे. ज्येष्ठताक्रम डावलणे ही बाब तशी नवी नाही. उच्च न्यायालयांच्या सरन्यायाधीशांची नेमणूक करतांना ज्येष्ठताक्रम डावलल्याची अनेक उदाहरणे आहेत. सर्वोच्च न्यायालयाबाबत हे प्रथमच घडते आहे इतकेच. आणि याचे संभाव्य परिणाम जर खरोखरच इतके भयावह असतील तर प्रश्न असा पडतो की अशी 'भयंकर परिणामगर्भता' अंगी असणारी शक्यता घटनाकारांनी घटनेत ठेवलीच कशी? तिला निःसंदिग्ध शब्दात प्रतिबंध का घातला नाही?

विचारान्ती असे आढळते की ही काही अशी एकमेव शक्यता नाही. घटनाकारांनी न्यायालयांच्या स्वातंत्र्याला बाधक ठरू शकतील अशा कित्येक शक्यता घटनेत सोडलेल्या आहेत. सरन्यायाधीशपदावर नियुक्ती करताना ज्येष्ठताक्रम सकारण वा अकारण डावलण्यास अवसर देणे ही त्यांच्यापैकी फक्त एक शक्यता आहे. एकमेव नव्हे. थोडक्यात न्यायालयांच्या स्वातंत्र्यासाठी घटनाकारांनी काय केले आहे आणि काय करायला हवे होते यासंबंधी विचार करणे हा प्रस्तुत निबंधाचा हेतु आहे.

निस्पृहपणे व निःपक्षपातीपणे निर्णय देणारे न्यायाधीश न्यायासनावर असायचे तर ते कार्यकारी सत्तेपासून तसेच कायदेमंडळापासूनही 'हस्तक्षेप-मुक्त' असणे आवश्यक ठरते. त्यादृष्टीने भारतीय घटनाकारांनी त्यांच्या नियुक्तीचे व पदच्युतीचे अधिकार संपूर्णतया कार्यकारी मंडळाच्या वा संसदेच्या हाती दिलेले नाहीत. राष्ट्रपती त्यांची नियुक्ती करू शकतो. पण मनःपूतपणे त्यांना काढून मात्र टाकू शकत नाही. त्यांचे निवृत्तीवय घटनेनेच ठरवून दिले आहे. उच्च न्यायालयाच्या न्यायाधीशाबाबत ते ६२ वर्षे असून सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायाधीशांबाबत ६५ वर्षे आहे. तत्पूर्वी त्यांना काढायचे तर सिद्ध झालेल्या दुर्वर्तनासाठी वा अपात्रतेसाठी त्यांच्यावर महाभियोग (इंपीचमेंट) चालवून संसद त्यांना काढू

शकते. मात्र महाभियोगाचा निर्णय दोन्ही सभागृहांच्या एकूण सभासदसंख्येपैकी साध्या बहुमताला व उपस्थित-मते देणाऱ्यापैकी २/३ बहुमताला संमत असणे आवश्यक असते. न्यायाधीशांची वेतने व भत्ते संसदेच्या कायद्यान्वये ठरत असले तरी त्यांची नेमणूक झाल्यानंतर त्यांना नुकसानकारक होतील असे बदल वेतनभत्त्यात करता येत नाहीत. एवढीच व्यवस्था घटनेने न्यायालयांच्या स्वातंत्र्यासाठी केली आहे. त्याचबरोबर आणखी एक गोष्ट नोंदवायला पाहिजे ती म्हणजे, संसदेतील वा संसदेबाहेरील चर्चांमधून वा वृत्तपत्रीय लिखाणांतून न्यायाधीशावर वा न्यायालयावर हेत्वारोप केले जाऊ नयेत अशीही व्यवस्था कायद्यांनी व पायंडयांनी या देशात रूजविली आहे. न्यायालयाच्या बेअदबीबद्दल शिक्षा होऊ शकते.

## पण एवढे पुरेसे आहे काय ?

न्यायालयीन स्वातंत्र्याच्या संरक्षणासाठी न्यायालयांचे कामकाज संसदेच्या हस्तक्षेपापासून मुक्त असावे याचा अर्थ न्यायालयीन निर्णय हवे तसे फिरविण्याचा अधिकार संसदेला असू नये असाही होतो. भारतात हे संरक्षण न्यायालयांना नाही. संसदेने सर्वोच्च न्यायालयाचे अनेक निर्णय कायद्यान्वये वा घटना-दुरूस्तीन्वये आजपर्यंत बदलले आहेत. घटनेनेच संसदेला तसा अवसर दिलेला आहे. भारतातील न्यायालयीन स्वातंत्र्याकरिता न्यायाधीश भयापासून व प्रलोभनापासून ( फीअर अँड फेवर ) मुक्त असणे अत्यावश्यक असते. त्यासाठी कार्यकारी मंडळाच्या ' मेहरबानी ' मुळे त्यांना काही गोष्टी प्राप्त होण्याची वा ' अवकृपे ' मुळे काही गोष्टींपासून वंचित होण्याची संधी घटनेने सोडता कामा नये. कारण त्यांना जसा व्यक्ती–व्यक्तींमधल्या प्रकरणांचा निवाडा करावा लागतो त्याचप्रमाणे व्यक्तीचे शासनापासूनही संरक्षण करावे लागते. इथे संघराज्य रचना अस्तित्वात असल्यामुळे केंद्राला राज्यापासून व राज्यसरकारांना केंद्रापासूनही संरक्षण द्यावे लागते. तेव्हा अशा कोणत्याही प्रकरणी कोणत्याही शासनाच्या बाजूने न्यायालयांनी पक्षपाती असणे परिणामी घातकच ठरेल. आणि नेमक्या याच बाबतीत घटनाकारांनी पुरेशी दक्षता घेतलेली दिसत नाही. शासना-करवी प्रलोभनांचा वापर करण्यासाठी व न्यायाधीशांकरवी प्रलोभने पदरात पाडून घेण्याचे 'प्रयत्न ' करण्यासाठी भरपूर वाव भारतीय घटनेन्वये मिळालेला आहे. कार्य-कारी सत्ता त्यांना पदावरून काढून टाकू शकत नसली व त्यामुळे न्यायाधीशांवर तसा बडगा ठेवू शकत नसली तरी प्रलोभनांच्या या जादुई ' लकडी 'च्या इशाऱ्यावर ती न्यायाधीशांना हवे तसे सहज वाकवू शकते. ताटाखालची मांजरे करून तोडू शकते. ओंजळीने पाणी पाजू शकते. कदाचित शासन असे काही करणारही नाही

पण तत्त्वांशी तडजोड करून शासनाचा कृपालोभ व मर्जी संपादित करण्याच्या हेतूने महत्त्वाकांक्षी न्यायाधीश असे प्रयत्न करणारच नाहीत असे कोण म्हणेल ?

घटनाकारांना हे टाळता आले असते असे वाटते. डॉ. के. व्ही. राव म्हणतात त्याप्रमाणे, सरन्यायाधीशपदाला वेगळे घटनात्मक स्थान देणे अनिवार्यच होते असे दिसत नाही; कारण घटनेने कोणतीच विशेष महत्त्वाची जबाबदारी या पदावर टाकलेली नाही. न्यायदानाच्या संदर्भात सरन्यायाधीशाचे अधिकार व कार्ये इतर न्यायाधीशाप्रमाणेच आहेत. जी काही कामे सरन्यायाधीशाला जास्त करावी लागतात ती प्रशासकीय व 'रूटीन' स्वरूपाची आहेत. म्हणून त्याचे वेतन व दर्जा इतर न्यायाधीशांएवढाच करणे हे सर्वोत्तम तत्त्व ठरले असते. किंवा हे पद चक्रक्रमाने (रोटेशन) एकेका न्यायाधीशाला प्राप्त होण्याची व्यवस्था केली असती तरी फारसे बिघडले नसते; किंवा केवळ ज्येष्ठताक्रमानेच हे पद दिले जाईल अशी स्पष्ट तरतूद केली असती तरीही चालले असते. यापैकी कोणत्याही मार्गाने ते पद प्रलोभनाच्या (पेट्रनेज) वापरापासून मुक्त ठेवता आले असते. लॉ कमिशनने केलेल्या शिफारशीमधे सरन्यायाधीशाला विशेष गुणवत्ता असणे आवश्यक असते असे जे म्हटले आहे ते कोणत्या हेतूने हेच समजू शकत नाही.

न्यायासनांच्या निःपक्षपातीपणावर आघात करू शकणारी आणखी अेक तरतूद म्हणजे, रिकाम्या झालेल्या सर न्यायाधीशपदावर सर्वोच्च न्यायालयाच्या कोणत्याही न्यायाधीशाची हंगामी नेमणूक करण्या संबंधीची. असे अस्थायीरीत्या नियुक्त झालेले न्यायाधीश त्या पदावर कायम होईपर्यंत स्वतंत्र व निर्भीड भूमिका स्वीकारून कार्यपालिकेस दुखावण्याचा धोका पत्करणेच शक्य नाही, हा विचार घटनाकारांनी ही तरतूद करताना का केला नसावा हे कळत नाही. उच्च न्यायालयाच्या न्यायाधीशांना सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायाधीशपदावर नियुक्त केले जाऊ शकण्यासंबंधीच्या तरतूदींचाही अनिष्ट परिणाम न्यायाधीशांच्या तटस्थतेवर होऊ शकतो. आजपर्यंत सर्वोच्च न्यायालयावर बहुसंख्य न्यायाधीश न्यायालयाच्या न्यायाधीशांमधूनच नियुक्त झाले आहेत. हा पायंडा या संदर्भात लक्षणीय ठरतो. सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायाधीशाचा दर्जा, स्थान, प्रतिष्ठा, वेतन, कार्यकाल – सगळेच उच्च न्यायालयाच्या न्यायाधीशापेक्षा जास्त आहे, तेव्हा त्या पदांच्या प्राप्तीसाठी उच्च न्यायालयाच्या न्यायाधीशांनी 'खास' प्रयत्न केल्यास त्यांना आपण दोष कसा देणार ? यावर एक साधा सरळ उपाय योजणे घटनाकारांना अवघड मुळीच नव्हते. उच्च न्यायाधीशांचा कार्यकाल आणि वेतन समान करून वरील प्रलोभनांची शक्यता टाळता आली असती. पण हे

झालेले नाही. घटनाकारांनी फक्त एकच बंधन न्यायाधीशांवर घातले होते, (पुढे सातव्या घटना दुरुस्तीने तेही सैल केले आहे.) आणि ते म्हणजे सेवानिवृत्तीनंतर न्यायाधीशांनी न्यायालयासमोर वकिली करू नये, कारण तसे केल्यास नंतरच्या न्यायाधीशांवर दबाव येऊ शकतो. आश्चर्य वाटते ते याचे की न्यायालयासमोर माजी न्यायाधीशाने वकिली करणे हे घटनाकारांना परिणामांच्या दृष्टीने, त्यांनी इतर पदांचा मोह बाळगण्यापेक्षा, अधिक भयावह कसे वाटले असावे याचे ! न्यायाधीश सेवेत असेपर्यंत व सेवानिवृत्त झाल्यावरसुद्धा त्यांना अनेक पदे देणे न देणे कार्यकारी सत्तेच्या हाती आहे. अनेक आयोगांची अध्यक्षपदे, मंत्रिमंडळे, राज्यपालपदे, निवडणुकांची तिकिटे, राजदूतपदे अशी कित्येक उदाहरणे देता येतील. कित्येक माजी न्यायाधीशांना ती आजपर्यंत प्राप्त झाली आहेत. घटनेने यासंबंधी कसलाच प्रत्यवाय घातलेला नाही. खरे पाहाता न्यायालयांचे स्वातंत्र्य टिकविण्याच्या दृष्टीने न्यायाधीशांनी अशी कोणतीही पदे स्वीकारण्यावर किंवा राजकारणात सहभागी होण्यावर संपूर्ण प्रतिबंध घटनेने लावायला हवा होता, म्हणजे राजकीय घटनांवर पक्षपाती अवांछित भाष्ये करण्याची वा सत्ताधाऱ्यांच्या धोरणांना उचलून धरण्याची वा लहानमोठी राजकीय महत्त्वाकांक्षा बाळगण्याची प्रवृत्ती न्यायाधीशांमधे वाढूच शकली नसती. न्यायासनासंबंधी योग्य तो आदर बाळगूनही असे म्हणावेसे वाटते की आज ही प्रवृत्ती अनिर्बंध होत आहे. घटना यासंबंधी काहीच सांगत नाही.

घटनेच्या मौनातून वा संदिग्धतेतून प्राप्त झालेल्या या अवसराचा फायदा काही न्यायाधीशांना वा सत्ताधाऱ्यांना घ्यावासा वाटणे स्वाभाविकच म्हणावे लागेल. आपल्या ध्येयधोरणाला पूरक ठरणारे न्यायालय सत्ताधाऱ्यांना हवे आहे तर आपल्या महत्त्वाकांक्षा पुरविणारे शासन काही न्यायाधीशांना हवे आहे असा हा अन्योन्याश्रयी संबंध आहे. उभयतांवर निर्बंध घालण्याची ज्या घटनाकारांची जबाबदारी होती त्यांनी ती स्पष्टपणे का पार पाडली नाही ? हा आजचा लाख मोलाचा प्रश्न आहे.

दुर्दैवाने असे म्हणावेसे वाटते की न्यायालयांच्या स्वातंत्र्यासंबंधी घटनाकारांच्या मनातील अपेक्षा व हेतू काहीही असोत ते स्वातंत्र्य प्रत्यक्षात उतरविण्याच्या दृष्टीने त्यांनी पुरेशी उपाययोजना केलेली नाही आणि म्हणूनच न्यायालयांचे स्वातंत्र्य जर आजपर्यंत अबाधित राहिलेच असेल तर अपघातामुळे वा निस्पृह बाण्याच्या न्यायाधीशांमुळे असेल. सुविहीत योजनेचा भाग त्यात बेताचाच आहे.

◆ ◆ ◆










प्र. रा. दामले

# गांधीजी व सुशिक्षित भारतीय

नवभारतच्या एप्रिलचे अंकात 'गांधीजींचे अनुयायी' या विषयावर काही विचार मांडले. परन्तु गांधीजींचे विचार व त्यांचे कार्य याचे महत्त्व त्यांच्या अनुयायांसच होते व इतरांस नाही असे नव्हे. गांधी या देशाचे व जगाचे होते. युगपुरुष असे सर्वार्थाने ज्यांना म्हणता येईल असे ते होते. असा एखादा महापुरुष ज्या काळात अवतरतो त्यातील सर्व जनतेवर व विशेषतः समकालीन सुशिक्षित नागरिकांवर मोठी जबाबदारी असते. ती त्यांच्या हातून पार पडली तरच त्या थोर व्यक्तीच्या कार्याचे चीज होते. म्हणून गांधीजींचे जीवन व कार्य चालू असताना व त्यानंतर आतापर्यंत सुशिक्षित भारतीयांची त्यांचे शिकवणुकीबद्दल प्रतिक्रिया काय होती, ती तशी का होती, व ती कशी असावयास हवी होती हे महत्त्वाचे प्रश्न आहेत.

'नवभारता'मध्ये १९५० च्या सुमारास सुशिक्षित मध्यमवर्गीय महाराष्ट्रि-यांबद्दल मी काही विवेचन केले होते. माझ्या आठवणीप्रमाणे श्री. शंकरराव देव यांनी त्या सुमारास सुशिक्षितांच्या देशहितविषयक उपेक्षेबद्दल काही लिखाण केले होते. त्याची प्रतिक्रिया म्हणून तो लेख लिहिला गेला होता. त्याला आता २० वर्षे लोटली व त्या प्रश्नावर अधिक निरीक्षण व विचार करण्यास संधी मिळाली. मला समजू लागल्यापासून गेले चाळीस वर्षे मी महाराष्ट्रीय सुशिक्षितात वावरत आहे. म्हणून त्यांचेबद्दल माझ्या आतापर्यंतच्या अनुभवावरून सुचलेले काही विचार संक्षिप्तपणे पण पद्धतशीरपणे येथे मांडणार आहे. सहाजिकच, मी प्रायः ज्या क्षेत्रात वावरलो त्यातील व्यक्तींचा मला जो अनुभव आला तेथून मी प्रारंभ करतो. गांधीजींचे कार्य व त्यांचा संदेश याशी त्याचा निकट संबंध आहे व तो कसा हे विवेचनाचे ओघात लक्षात येईलच.

गेल्या दोन-तीन दशकांत विद्यापीठीय व महाविद्यालयीन कार्यकर्त्यांपुढे जे प्रश्न होते त्यांत एका अर्थी माध्यमाचा प्रश्न सर्वांत महत्त्वाचा होता. त्या प्रश्नाची हेळसांड बहुसंख्य सुशिक्षितांनी इतकी केली की कोणाही प्रामाणिक कार्यकर्त्यास

अनुक्रमणिका

उबग यावा. विद्यापीठीय कार्यकर्ते विद्यापीठीय autonomy ( स्वायत्तता ) पाहिजे म्हणून नेहमी आग्रहाने प्रतिपादन करीत असतात. परन्तु ती त्यांना खरोखर नको आहे– पेलत– परवडत नाही. हे माध्यमाच्या प्रश्नाचे बाबतीत स्पष्ट होते. मातृभाषा माध्यम असावी याबद्दल खरोखर दुमत होण्यास वाव नाही. टिळक व गांधीजी या दोघांनीही याबद्दल अनेकवेळा निःसंदेह विधाने केली आहेत व गांधींनी अत्यंत उत्कटतेने सतत त्याचा सक्रिय पुरस्कार केला. सर्व प्रगत देशांतल्या शिक्षणतज्ञांत या प्रश्नाबद्दल एकमत आहे व आम्हास स्वराज्य पाहिजे या मागणीचा एक अर्थ आमचे सर्व व्यवहार आम्हास मातृभाषेत करता आले पाहिजेत असा आहे. परन्तु या प्रश्नाची मी स्वतः पुणे विद्यापीठात गेली २५ वर्षे जी अनेकवेळा चर्चा झालेली पाहिली त्यावरुन मी असे निर्विवाद म्हणू शकतो की अपवाद सोडल्यास सामान्यतः विद्यापीठीय व महाविद्यालयीन प्राध्यापकात माध्यमविषयक काही Conviction नाही व म्हणून खऱ्याखोट्या व्यावहारिक अडचणी पुढे करून माध्यमविषयक योग्य धोरण घेणे ते टाळीत किंवा लांबवीत आहेत. अशा चर्चेच्या प्रत्येकवेळी भारत सरकार व इतर राज्ये काय करतात, विद्यापीठ अनुदान मंडळाचे धोरण काय आहे हे पाहून मग कार्यवाही करावी असा पोक्त सल्ला ही मंडळी सतत देत असतात. मातृभाषा माध्यम हवे असे म्हणणाऱ्या लोकांकडून क्वचित अतिरेक होतही असेल व आपल्या शासनाने घोषणा कितीही केल्या तरी तेही अद्याप पुराणमतवादी आहे यामुळे मातृभाषा माध्यम केल्याने काही व्यावहारिक अडचणी काही वेळ येतील हेही खरे. परंतु अडचणी येतील म्हणून पाऊलच पुढे टाकू नये असे, ज्याला या प्रश्नाविषयी समजूत आहे किंवा आस्था आहे असे कोणीही करणार नाही. माध्यमाप्रमाणेच आणखी अनेक प्रश्नांबाबत उच्च सुशिक्षितांची परप्रत्ययनेय बुद्धी लक्षात येते. काही वर्षांपूर्वी भारतातील अनेक विद्यापीठांनी तीन वर्षांचा पदवी अभ्यासक्रम स्वीकारला. त्याचे मुख्य कारण विद्यापीठ अनुदान मंडळाचे त्यावेळचे अध्यक्ष श्री. चिंतामणराव देशमुख यांनी त्याचा पुरस्कार केला व मंडळाकडून मिळणारी मदत त्या अभ्यासक्रमाच्या स्वीकारावर अवलंबून आहे अशी बहुतेक विद्यापीठीय नेत्यांची चुकीची समजूत झाली होती. परिणामी जुनाच अभ्यासक्रम नवे मथळे देऊन चालू ठेवला, इतकाच नव्या अभ्यासक्रमाच्या स्वीकाराचा अर्थ ठरला. परीक्षा कमी कराव्या अशी मूळ योजना असून त्या वाढल्या व जनरल एज्युकेशन किंवा रिअल स्पेशलायझेशन ही जी दोन नवीन अंगे या अभ्यासक्रमाचे योजकांचे मनात होती त्याचा मागमूसही आता चालू असलेल्या

शिक्षणक्रमात दिसत नाही. पुणे विद्यापीठात पहिले काही वर्षांत पुणे शहरातील मध्योत्तर शिक्षणाच्या केंद्रीकरणाचा जो वाद आठ वर्षे चालला त्यातही दोन्ही पक्षातील मिळून ५–१० व्यक्ती सोडल्या तर त्या प्रश्नाचे स्वरूप कोणास कळले होते असे वाटत नाही. चीनच्या आक्रमणानंतर पुणे विद्यापीठाने अतिशय तातडीने मिलिटरी स्टडीजचा अभ्यासक्रम B. A. स्पेशल विषयात समाविष्ट केला. त्यावेळच्या चर्चेची मला आठवण येते. काही शैक्षणिक मूल्ये किंवा तारतम्य न बाळगता अगदी सामान्य जनता भावनेच्या आहारी जाऊन जशी वागते तसे विद्यापीठाचे झाले. साहजिकच तो उत्साह तात्कालीक होता व नंतर त्या अभ्यासक्रमाला विशेष कोणाचाच पाठिंबा नाही हे लक्षात आले, कारण कोणी त्याचा नीट विचारच केला नव्हता. अशी अनेक उदाहरणे देता येतील व ही विद्यापीठीय क्षेत्रातील असल्यामुळे सर्वोच्च शिक्षण घेतलेल्या व्यक्तींचा दृष्टी-कोन व मूलभूत प्रश्नांचा विचार करण्याची त्यांची पातळी व पात्रता याची त्यावरून कल्पना येते.

आणखी दोन–तीन शैक्षणिक प्रश्नांबद्दल येथे निर्देश करण्यासारखा आहे. आपण भारतीय लोक, ‘तत्त्वज्ञान व धर्म हे आपल्या विशेष आवडीचे व आस्थेचे विषय आहेत’ असे नेहमी म्हणत असतो व त्यात काही उच्च दर्जाची कामगिरी गेल्या शंभर वर्षांत हिंदुस्थानात झालीही आहे. पण त्यात विद्यापीठीय किंवा उच्चसुशिक्षितांचा वाटा फारच थोडा आहे. गीतारहस्याइतपत ग्रंथही महाराष्ट्रीय प्राध्यापक, संशोधकांकडून निर्माण झाला नाही. ही एक खुणेची गोष्ट म्हणून लक्षात घेण्यासारखी आहे. भारतीय तत्त्वज्ञान व संस्कृतविद्या यातही अत्यंत उत्कृष्ट ग्रंथ प्रथम झाले. ते पाश्चात्य विद्वानांचेच. राधाकृष्णन् वगैरे लोकप्रिय ग्रंथकारांनी लिहिलेले ग्रंथ भारतीय तत्त्वज्ञानाचा अभ्यास व नवनिर्मिती या दृष्टीने नुसत्या पूर्वतयारीच्या स्वरूपाचे आहेत हे विचारान्ती लक्षात येते. विज्ञानात समाजविज्ञानाचे स्थान अगदी अलिकडच्या काळापर्यंत आपल्या विद्वानांना समजले होते, असे दिसत नाही. शिवाय सामाजिक शास्त्रांचा परस्पर संबंध व सामाजिक असली तरी ती शास्त्रे आहेत ही जाणीव जितकी असावी तितकी दिसत नाही. वर निर्देश केलेल्या बाबी उदाहरणादाखल दिलेल्या आहेत. त्यातील काहींबद्दल मतभेद होणे शक्य आहे परंतु सुशिक्षित नागरिकांनी पाळण्याची मुख्य पथ्ये म्हणजे स्वतः विचार करणे, आजूबाजूच्या परिस्थितीकडे जागरुकपणे पाहणे व आपणास शिक्षणाची संधी मिळाली ही जाणीव ठेऊन समाजास मार्गदर्शन व सहाय्य करण्यास तयार असणे हे त्यांचेकडून

समाधानकारक रीतीने होत नाही असे वरील सर्व बाबींचा साकल्याने विचार केला तर जाणवते.

विद्यापीठीय व इतर सुशिक्षितांबद्दल दुसऱ्या अनेक गोष्टी अनुभवास येतात. त्यातील अतिशय खटकणारी गोष्ट अशी की स्वदेशीची जाणीव या मंडळीत नाहीच असे म्हटले तरी चालेल. आपले कपडे, आपल्या उपयोगात येणाऱ्या दुसऱ्या सुखसोयींच्या वस्तू ही आपल्या देशात होत असतील तर तीच आपण वापरावी असा विचारही त्यांना सुचत नाही असे अनुभवास येते. परदेशांहून आयात केलेल्या वस्तू आपण वापरतो हे ही मंडळी प्रौढीने सांगत असतात. लोकशाहीमध्ये सर्व नागरिकांवर विशेषतः सुशिक्षितांवर आपण ज्या संस्थात असू त्यात योग्यवेळी निरलसपणे मतप्रदर्शन करणे व मतदान करणे हे कर्तव्य होय तेही बहुसंख्य सुशिक्षित पाळतात असे दिसत नाही. स्वतः हौसेने स्थापलेल्या संस्थांच्या सभांनाही त्यांची उपस्थिती इतकी कमी असते की कार्यवाहांना विनंती व आग्रह करून किमान गणसंख्या अनेकवेळा जमवावी लागते. ब्रिटिश राजवटीत शिक्षणाने भारतीय लोक स्वाभिमानी होतील व देशात असंतोष पसरवतील म्हणून सुशिक्षितांना ब्रिटिश राज्यकर्ते बिचकत. अपवाद सोडले व ट्रेड युनियन प्रकारच्या संघटना सोडल्या तर सामान्य सुशिक्षित आज स्वराज्यातही इतका लाचारीने वागतो की संबंधित मंत्री किंवा उच्च अधिकारी यांनाही अवघड वाटावे ! राजकारणाबद्दल ही मंडळी चर्चा करीत नाहीत असे नव्हे पण विचारपूर्वक करतात असे क्वचितच दिसते. शिवसेना, जनसंघ, मुस्लिमलीग यांच्या अनुयायात अनेक सुशिक्षित आहेत. परंतु त्यांच्याशी चर्चा करताना त्यांना या भूमिकांचे बौद्धिक समर्थन करता येते असे दिसत नाही. शासनावर सतत टीका करणाऱ्यांपैकी ही मंडळी असतात. परंतु सार्वत्रिक निवडणुकीचे निकाल आपण जे पाहतो त्यावरून त्यांचे प्रत्यक्ष मतदान कसे होते हे दिसून येते. पाकिस्तानशी भारताचे संबंध, नेहरूंचे Non alignment चे धोरण, समाजवाद, उद्योगधंद्यांचे राष्ट्रीयकरण अशा खरोखरच गुंतागुंतीच्या प्रश्नांविषयी इतकी उथळ मते भावनेच्या आहारी जाऊन ते प्रदर्शित करतात की आश्चर्य वाटावे. फार काय वेळेवर कामावर जाणे, सभांना वेळेवर जाणे, पत्र आले तर त्याला साक्षेपाने उत्तर देणे हेही फार थोड्या सुशिक्षितांना जमते व यात आपला काही दोष आहे असेही त्यांना दिसत नाही.

आपण या देशात Mercenary वृत्ती बळावली आहे असे म्हणतो व विचारान्ती ते हिताचे नाही असे मान्यही करतो. पण या देशातील उच्च शिक्षित डॉक्टर, इंजिनिअर, वकील, प्राध्यापक व वरिष्ठ जागी असलेले अधिकारी यांस

त्यांच्या वागणुकीवरून पहायचे तर पैशाशिवाय काही मूल्य विशेष महत्त्वाचे वाटते असे दिसत नाही.

गांधीजी १९२० च्या सुमारास येथील सार्वजनिक जीवनात भाग घेऊ लागले व अगदी लवकरच देशाच्या राष्ट्रीय जीवनाचे नेतृत्व त्यांच्याकडे आले. १९४८ मध्ये त्यांचे निधन होईपर्यंत ते सतत त्यांच्याकडे राहिले. ही वस्तुस्थिती कोणीही अमान्य करणार नाही, परंतु १९२० ते ४७ या कालखंडात काँग्रेसचे अनुयायी नसलेल्या किती सुशिक्षितांनी गांधींची भूमिका समजून घेण्याचा प्रयत्न केला, या प्रश्नाचे उत्तर 'अगदीच थोड्यांना' असे द्यावे लागेल. गांधी भारतीय राजकारणात प्रभावी झाल्यानंतर राजकीयपक्ष म्हणून काँग्रेसपक्ष हा इतर पक्षांच्या मानाने फार प्रबळ झाला व Round table conference च्या वेळेला 'On behalf of the Indian National Congress I represent 85% of Indians' या गांधींच्या विधानात अतिशयोक्ती असली तरी तथ्य होते. हे ब्रिटिश सरकारलाही मान्य होते. गांधींचे विधान पूर्णपणे खरे नव्हते, हे पुढे देशाची फाळणी झाली व अस्पृश्यांचा प्रश्न अद्यापही समाधानकारकपणे सुटला नाही यावरून स्पष्ट होते. परन्तु प्रस्तुत मुद्दा असा की जे कार्य इतक्या प्रभावीपणे गांधी या देशात करीत होते ते काय आहे हे समजून घेऊन शक्य तेथे सहकार्य व जरूर तेथे त्याबद्दल नापसंती दाखविणे हे देशातील सुशिक्षित म्हणविणाऱ्या नागरिकांचे कर्तव्य नव्हते काय ? नुसत्या राजकीयक्षेत्राचा विचार केला तरी या देशात गांधींनी अभूतपूर्व जागृती घडवून आणली व राजनीतिनिपुण अशा ब्रिटिशांनाही त्यांनी गोंधळात टाकले. गांधींचे पूर्वी थोर देशभक्त होऊन गेले. त्यांनी पूर्वतयारी केली म्हणूनच गांधींना इतकी मोठी कामगिरी करता आली व गांधींनी देशाला दिलेला संदेश आपआपल्या प्रकारे आधीच्या नेत्यांनीही दिला होता हे खरे असले तरी गांधींची कार्यपद्धती, दृष्टिकोन, उत्कटता व प्रतिभा यामुळे इतर सर्व नेत्यांच्या तुलनेने राजकीयक्षेत्रातही गांधीजी सर्वश्रेष्ठ पुढारी ठरले. असे असून त्यांचे कार्य व कार्यपद्धती हिचे वैशिष्टच समजून घेऊन जनतेस त्याची योग्य जाणीव करून देण्याचे काम सुशिक्षितांनी केले असे म्हणता येत नाही. गांधींच्या कार्यपद्धतीत दोन ताण होते, एक– भारतीयांनी ब्रिटिशांशी कसे वागावे याबद्दल व दुसरा– भारतीयांनी आपण स्वतः काय करावे व आपसात कसे वागावे याबद्दल. राजकारणात भाग घेणे शक्य नसलेल्या सुशिक्षितांनाही त्यांच्या कार्याच्या दुसऱ्या भागात रस घेता आला असता. तसे म्हटले तर गांधींच्या मताप्रमाणे व दूरवर विचार केला तर निरुपद्रवी दिसणारा असा हा दुसरा भागच

अधिक महत्त्वाचा होता व तो कार्यवाहीत आणल्यानेच स्वराज्यप्राप्ती झाली असे खऱ्या अर्थाने म्हणता येणार होते.

गांधींच्या राजकीय चळवळीचा कणा ज्याला म्हणता येईल ती बाब म्हणजे परकीय सत्तेची शिसारी व म्हणून तिच्याशी पूर्ण असहकार व त्याबरोबरच शान्ततेचे काटेकोरपणे पालन. या दोन गुणांच्या समन्वयामुळे गांधींनी अनेक गोष्टी साधल्या. असल्या चळवळीत जनतेस जाहीरपणे व फार मोठ्या संख्येने भाग घेणे शक्य झाले व ब्रिटिश राजवट खिळखिळी करण्यास व त्यांच्यावर दडपण आणण्यास याचा फार उपयोग झाला. असली अहिंसात्मक चळवळ दडपून टाकणे ब्रिटिश राज्यकर्त्यांस फार अवघड होते; कारण आंतरराष्ट्रिय-क्षेत्रात त्यामुळे ब्रिटिशांची नाचक्की झाली असती. १९२१ मध्ये गांधींनी राजकीय चळवळ सुरु केल्यापासून ४७ मध्ये स्वराज्यप्राप्ती होईपर्यंत गांधीजींच्या राजकीय कार्यपद्धतीची वैशिष्टचे मी ज्या सुशिक्षितात मुंबई-पुण्यात वावरलो, त्यांपैकी अगदीच थोडयांनी समजून घेतली होती हे मी स्वानुभवाने सांगू शकतो. गांधींच्या राजकीय अनुयायात उच्च शिक्षित व बुद्धिमान व्यक्ती नव्हत्या असे नव्हे. नेहरु, राजाजी, राजेंद्रप्रसाद, वल्लभभाई, सुभाष बोस, राजगोपाळाचार्य व अन्य पक्षांतील व क्षेत्रातील फार कर्तबगार, विद्वान नेते गांधी हेच देशाचे पुढारी होऊ शकतात हे लक्षात घेऊन आपआपल्या स्थानावरुन त्यांस पाठींबा देत होते. परन्तु हे सामान्य सुशिक्षितांचे प्रतिनिधी नसून अपवाद ठरावे इतके थोडे होते.

याहीपेक्षा खेदाची गोष्ट अशी की गांधीजींच्या कार्याचा रचनात्मक कार्यक्रमाचा भागही कोणी नीट समजून घेतला नाही. उलट अनेक सुशिक्षितांनी त्यांची कुचेष्टाच केली. या बाबतीत अतिशय महत्त्वाची बाब म्हणजे गांधींची खादीवरील निष्ठा. 'खादी व चरखा ही माझ्या कार्याचा मध्यबिंदू आहेत' असे गांधीजी सतत म्हणत. वर्षानुवर्ष दररोज काही तास ते स्वतः सूत काढीत व सर्व रोगांवर रामबाण असा खादीच्या मंत्राचा स्वतः जप करीत व दुसऱ्यांना सांगत. खादी हे अनेक इष्ट गोष्टींचे प्रतीक होते. पहिली गोष्ट उद्योग आणि कष्ट यांच्या महत्त्वाची जाणीव, दुसरी स्वदेशीबाणा व तिसरी गरीब आणि श्रीमंत हे भेद बाजूला टाकून सर्व माणसे एकाच पातळीवर आणण्याचा व म्हणून त्यांच्यात भावनीक ऐक्य निर्माण करण्याचा खादी हा प्रभावी प्रयत्न होता. स्वराज्या-पूर्वी खादी हे सकृत दर्शनी निरुपद्रवी पण अतिशय बलशाली असे जनतेचे शस्त्र होते, कारण खादीच्या निर्मितीकरिता योग्य भावनेने एकत्र आलेल्या भारतीयांना

कोठल्याही परकी सत्तेला फार काळ आपल्या हुकमती खाली ठेवणे अशक्य होते. गांधीटोपीला ब्रिटिश राज्यकर्ते बिचकू लागले ते यामुळेच. खादी सोडा पण स्वदेशी, साधेपणा, गरीब श्रीमंतांतील भावनेचे ऐक्य ही तरी इष्ट आहेत असे सुशिक्षितांचे उच्चार व आचारावरून दिसत नाही. त्यांचे विचार काय आहेत याबद्दल त्यावरून अनुमान करता येईल.

गांधींच्या विधायक कार्यक्रमात मद्यपानबंदीला महत्त्वाचे स्थान होते. ब्रिटिश लोकांशी लढा देताना गांधींच्या आधीपासून राजकीय कार्यकर्ते न समजलेल्यांनीही या बाबत प्रयत्न केले व ब्रिटिश राज्ययंत्रणेस विरोध करूनही मद्यपानबंदीचा प्रचार केला. आपल्या घटनेतील मार्गदर्शक तत्त्वांमध्ये मद्यपान-बंदीचा निर्देशही आहे परन्तु त्या धोरणाची आज इतकी परवड झाली आहे की आमच्या राज्यात आता मद्यपानबंदी राहिली नाही हे अनेक राज्यशासक व बहुसंख्य सुशिक्षित नागरिक प्रौढीने म्हणू लागले आहेत. Excise tax is tainted money' असे गांधी म्हणत. त्याची आता बहुतेकजण कुचेष्टाच करतात. परदेशी व वाढत्या प्रमाणात तयार केल्या जाणाऱ्या स्वदेशी दारूवरील करांच्या रूपाने आलेल्या पैशाचा आपण गरिबांकरिता उपयोग करणार आहोत असे राज्यांचे मुख्यमंत्री वारंवार सांगत असतात, व तात्त्विक उपसंहार म्हणून दारुबंदी ही कायद्याने घडवून आणण्याची सुधारणा नसून लोकमत सुशिक्षित करुन दारूचा प्रसार कमी केला पाहिजे असे सांगितले जाते. आज मुंबई, पुणे, दिल्ली, कलकत्ता अशा मोठ्या शहरांतच नव्हे तर लहान-लहान शहरांतही दारू घेणे ही गोष्ट status ची symbol ठरू पहात आहे. क्वचित आमच्या एखाद्या एम्बसीत परदेशी पाहुण्यांना दारू ऐवजी थंडपेय दिले गेले तर 'टाईम्स ऑफ इंडिया' सारख्या उच्चभ्रू वर्तमानपत्रात त्या घटनेबद्दल नापसंती दर्शविली जाते. कुचेष्टा केली जाते. ब्रिटिश अमदानीत मद्यपान होत असे त्यापेक्षा कितीतरी अधिक व कितीतरी फुशारकीने ते आता सुशिक्षितांकडून केले जाते. मद्यपानबंदी कायद्याने घड-वून आणण्याचा प्रयत्न केला त्यात बरेच अपयश आले. ठिकठिकाणी बेकायदा दारू तयार केली जाऊ लागली व त्यातून लाचलुचपत व इतर गुन्हे वाढले हे सर्व खरे असले तरी या प्रश्नाबाबत सुशिक्षितांचा दृष्टिकोन व आचार हा अत्यंत अविचा-राचा आहे. शारीरिक श्रमाने थकलेल्या, जीवनात हौसेमौजेच्या गोष्टी ज्यांच्याजवळ उपलब्ध नाहीत अशा गरीब, अशिक्षित नागरिकांनी मद्यपान केले तर ते समजण्या-सारखे आहे. परंतु उच्च शिक्षण, जीवनातील सुखसोयी ज्यांना आहेत अशा व्यक्तींनी मद्यपानाचे संभाव्य धोके लक्षात घेऊन ते कटाक्षाने टाळणे व आपल्या उदाहरणाने अशिक्षित व दारिद्र्यात व अडचणीत असलेल्या गरीब नागरिकांना





उदाहरण घालून देणे आवश्यक आहे. याबाबत काँग्रेसपक्षीय शासन तर दोषी आहेच परंतु कोठच्याही राजकीय पक्षात नसलेले बहुसंख्य सुशिक्षितही आजच्या अनिष्ट परिस्थितीस जबाबदार आहेत. रचनात्मक कार्यक्रमांपैकी हिंदू मुसलमान यांची एकी व अस्पृश्यता निवारण या दोहोंबद्दलही बहुसंख्य सुशिक्षितांना त्यांचे महत्त्व व निकड पटावी इतकी पटली नाही असेच म्हणावे लागेल. मूलोद्योग शिक्षणाबद्दल प्रत्यक्ष फार कार्य करण्यास गांधींना स्वतःला वेळ झाला नाही. परंतु 'मूलोद्योगशिक्षण ही माझी भारतास एकमेव देणगी आहे' असे ते म्हणत यावरून त्यांना ते किती महत्त्वाचे वाटे हे लक्षात येण्यासारखे आहे. आपल्या परिवारातल्या शिक्षणतज्ज्ञांकडून त्यांनी याबाबतीत अनेक वर्षे प्रयत्नही केले हेही सर्वांस माहीत आहे. मौज अशी की अत्यंत आधुनिक अशा अनेक पाश्चात्य शिक्षणतज्ज्ञांनी हे शिक्षणविषयक विचार गेले शेपन्नास वर्षांत प्रदर्शित केले त्यात व गांधींचे शिक्षणविषयक भूमिकेत पुष्कळ साम्य आहे. तरीही स्वातंत्र्यपूर्व काळात व नंतर या देशात शिक्षणाचा कारभार ज्यांच्याकडे होता व आहे ते उच्चशिक्षित नागरिक प्रायः गांधींच्या शिक्षणविषयक मताबद्दल उदासीन आहेत व basic education चे जे प्रयोग झाले ते इतक्या अनास्थेने व अडाणीपणाने केले गेले की त्यास अपयश येणे अपरिहार्यच होते.

गांधींच्या शिकवणुकीच्या आणखी एका भागाबद्दल बहुसंख्य सुशिक्षितांनी सतत चुकीचा ग्रह करून घेतला. तो म्हणजे गांधींची धर्मनिष्ठा व धर्मविषयक भूमिका. गांधी धर्मनिष्ठ होते म्हणून त्यांच्या विचारात तात्त्विक महत्त्वाचे काही नव्हते, त्यांना वैज्ञानिक दृष्टी नव्हती किंवा राजकारणात लागणारे मनुष्यस्वभावाचे ज्ञान त्यांना नव्हते असे अनेकांना वाटते, पण गांधींची धर्माची कल्पना अशी होती की धर्म सर्व जीवन व्यापून राहिला आहे. ईश्वरभक्ती म्हणजे मानवसेवा असे ते म्हणत. गांधी आपल्या प्रार्थनासभात जे विषय हाताळीत त्यावरून हे सहज लक्षात येण्यासारखे आहे. कोणी व्यक्ती धर्मनिष्ठ असली म्हणजे ती बुद्धिवादी नसते असे किंवा गांधी आपण हिंदु आहोत असे म्हणत, त्यामुळे हिंदु धर्मात असलेली जातीजातीतील विषमता ते कधीच दूर करू शकले नसते हेही गैरसमज होते. खरी गोष्ट अशी आहे की जे प्रत्यक्ष कार्य करणारे असतात त्यांना परिस्थितीच्या मर्यादा ओळखून त्यावर मात करायची असते. नुसते शाब्दिक वाद करायचे व ऐकायचे नसतात. गांधी पढिक विद्वान किंवा वैचारिक संशोधक नव्हते परंतु त्यांचे लिखाण व वक्तव्य नीट वाचले असता त्यांचे विचार किती मूलगामी होते व स्पष्ट होते हे लक्षात येते. टिळकांबद्दल अर्थात ते विद्वान नव्हते किंवा बुद्धिवादी नव्हते असे कोणी

म्हणत नाही. परंतु ते परंपरेने जखडलेले होते असे सुशिक्षितांतील अनेकजण म्हणतात. परंतु टिळक कर्मयोगी होते हे जर लक्षात ठेवले तर ते परंपरेचे गुलाम नसून असलेली परंपरा आपल्या कार्यार्थ प्राप्त परिस्थितीत राबवीत होते हे लक्षात येते. सर्व मोठी माणसे हेच करतात. विवेकानंदांनी हेच केले व जी वेदांत विद्या व्यक्तीस प्रपंचविन्मुख बनविते अशी प्रचलित समजूत आहे त्या विद्येच्या पुरस्कर्त्यांकडून समाजसेवेची कर्तबगार यंत्रणा त्यांनी निर्मिली व देशभर पसरविली. स्वातंत्र्यवीर सावरकर यांनी व्याख्यानात केलेले एक विधान या संदर्भात मला आठवते. मुंबईस एका सभेत बोलताना ते म्हणाले "मी हिंदुत्ववादी आहे म्हणून मला अनेकजण दोष देतात, परंतु खरी गोष्ट अशी की सर्वसामान्य हिंदूंना माझ्या हिंदुत्वाच्या कल्पना रुचण्यासारख्या नाहीत. मी केलेले अस्पृश्यता निवारणाचे प्रयत्न पुष्कळ हिंदूंना बोचले व बोचतात. सामान्य हिंदू गोमातेच्या गोष्टी करतो, 'ती पूज्य आहे,' असे म्हणतो. मी गाईस फक्त उपयुक्त पशु असे समजतो व उपाशी माणसाचा घास मी कधीही गाईला देणार नाही." अशी एकनादोन अनेक उदाहरणे देता येतील. या सर्वांचा अर्थ इतकाच की सावरकर हिंदुत्वनिष्ठ होते हे खरे असले तरी ते पारंपरिक हिंदुत्वाचे गुलाम नव्हते. नवे हिंदुत्व निर्माण करण्याचा त्यांचा प्रयत्न होता. हीच गोष्ट वर्णाश्रम वगैरे बाबींबद्दलच्या गांधींच्या भूमिकेबद्दल म्हणता येईल.

गांधी व साम्यवाद याविषयी बराच गैरसमज सुशिक्षितात व राजकीय पक्षांच्या अनेक नेत्यांत आहे. गांधी साम्यवादी नव्हते व गांधींचा सर्वोदय हे साम्यवादाला उत्तर आहे या भूमिकेत तथ्य आहे. परंतु साम्यवादाचे उद्दिष्ट जर विषमता नाहिशी करणे, मागासलेल्या, दारिद्र्यात असलेल्या व पायदळी तुडविल्या गेलेल्या जनतेला ज्ञान देणे हे असेल तर ते गांधींचेही होते व त्या उद्दिष्टाबाबत त्यास कोणतीही तडजोड मान्य झाली नसती. दुसरे असे की साम्यवादी वर्गकलह व हिंसा ही अपरिहार्य समजतात तसे गांधी समजत नव्हते हे खरे असले तरी सामाजिक अन्याय दूर होण्याला दुसरा पर्यायी मार्ग नसला तर कमीतकमी हिंसा करून तो दूर करावा, पण अन्याय सहन करू नये, असे गांधींचे म्हणणे होते. गांधी प्रेमाची, चर्चेची, मने वळविण्याची भाषा करीत व ती खरी होती. परंतु नसते 'सांगून पहा,' अशा अर्थाची ती भूमिका नव्हती. गांधी हे सत्याग्रही होते, लढवय्ये होते व त्यास पसंत असलेली शस्त्रे साम्यवादी किंवा इतर सामाजिक कार्यकर्ते वापरतात त्यापेक्षा वेगळी असली तरी ती शस्त्रेच होती हे लक्षात ठेवले पाहिजे. श्रीमंत व्यक्तींना गांधी आपआपल्या संपत्तीचे विश्वस्त व्हावयास सांगत व ते तसे झाले म्हणजे वर्गकलहाशिवाय सर्वांच्या समजुतीने सर्वांचेच कल्याण होईल

अनुक्रमणिका

असे ते म्हणत हे खरे असले तरी श्रीमंतांना विश्वस्त व्हावे लागेल अशी 'परिस्थिती निर्माण' करण्याची बाबतही ते बोलत हे लक्षात ठेवले पाहिजे. गांधी व विनोबा यांची गरिबांबद्दल असलेली कणव लक्षात घेतली, त्यांचे याबाबतचे अनेक उद्गार लक्षात घेतले, तर त्यांची भूमिका साम्यवादाच्या 'अलिकडील' नसून 'पलिकडील' आहे हे लक्षात येते. अर्थात गांधींचा विकेंद्रीकरणावर विश्वास होता, परन्तु तो विश्वास साम्यवाद्यांचाच नव्हे तर समाजवादी किंवा लोकशाही-प्रेमी जे आपणास म्हणवतात त्यांचाही आहे असे दिसत नाही. वैयक्तिक व सामाजिक व्यवहारात साधेपणा व सर्व योजनांत विकेंद्रीकरण या दोन महत्त्वाच्या गोष्टी गांधींनी ज्या आस्थेने प्रतिपादिल्या ती कोणीच लक्षात घेतल्या नाहीत. याही बाबतीत सुशिक्षित समजल्या जाणाऱ्या भारतीयांनी जनतेचे काही मार्गदर्शन केले असे दिसत नाही. खरोखर गांधींच्या शिकवणुकीचे वैशिष्टच त्यात आहे व आपल्या देशापुढीलच नव्हे तर जगापुढील विकट समस्या सोडविण्याचा तो खरा मार्ग आहे. लोकशाही, समाजवाद, साम्यवाद यांहून गांधीवाद बरोबर वेगळा कसा होता हे ओळखले गेले नाही व हे कार्य खरोखर सुशिक्षित विचार-वंतांनाच करण्याजोगे होते.

मी असे म्हणणार नाही की बहुसंख्य सुशिक्षितांनी गांधींचे अनुयायीत्व स्वीकारावयास हवे होते. अनेकांना ते शक्य नसणारच. गांधींचे कार्यात व दृष्टि-कोनात दोष नव्हते असेही कोणी म्हणत नाही. परंतु हिंदुस्तानचे सुशिक्षित नागरिक म्हणून आपआपले व्यवसाय करीत कुटुंबयात्रा चालवीत असता गांधी ज्या गोष्टी सांगत होते त्या काय ते समजावून घेऊन योग्य प्रकारे त्या आपआपल्या क्षेत्रात इतरास सुशिक्षित भारतीयांनी पटवावयास हव्या होत्या. गांधी हे विद्वान नव्हते, स्वतःस ते बुद्धिमार्गी म्हणत नसत व म्हणून त्यांचे कार्य व दृष्टिकोन सुशिक्षितांना मानवण्यासारखा नव्हता असे अनेकदा म्हटले जाते. "I have failed in converting the Indian intellectuals" व "My appeal is to the heart not Reason," असे उद्गार गांधी काढीत. परंतु जरा विचारपूर्वक गांधीजींचे आचरणाकडे व शिकवणुकीकडे पाहिले व त्यांचे वक्तव्य व लेखन यांचा अभ्यास केला म्हणजे गांधीजींच्या विचारात भोंगळपणा नव्हता व व्यवहारातील काटेकोरपणातही ते कमी नव्हते हे लक्षात येते. "I am no visinory; I am a Baniya" असे ते म्हणत ते मनःपूर्वक असे. त्यांचे ध्येय उच्च असेल व मनुष्याच्या सत्वृत्तीवर त्यांचा विश्वास असला तरीही ते फार जागरुकपणे व चाणाक्षपणे लहानमोठे व्यवहार करीत हे त्यांचे जीवनात पदोपदी दिसून येते. म्हणून सामान्य प्रापंचिक सुशिक्षितापेक्षा त्यांचा जीवनक्रम पुष्कळ

वेगळा असला तरीही गांधी काय म्हणतात हे समजून घेणे सुशिक्षितास शक्य होते व ते त्यांचे कर्तव्य होते. शेवटी जीवनमूल्ये निर्माण होतात, थोर प्रतिभावान कार्यप्रवणांकडून. परंतु त्यांच्या शिकवणुकीचा अन्वयार्थ लावून त्याचे चीज करणे, ती व्यवहारात रुळवणे हे सुशिक्षितांचे कार्य असते. माझ्या मते गांधीच नव्हे तर रानडे, टिळक, गोखले, फुले, राममोहन रॉय, विवेकानंद, टागोर इत्यादी थोर नेत्यांची या देशातील सुशिक्षितांनी उपेक्षा केली. परिणामी या थोर नेत्यांच्या कर्तबगारीचे पुरेसे चीज व्हावे तसे झाले नाही. देशाचे व्हावे तितके हित झाले नाही व उलट सुशिक्षितांबद्दल सामान्य जनतेस जो आपलेपणा व आदर अपेक्षित आहे तोही दिसत नाही. तसे पाहिले तर गांधींनी सांगितलेल्या बहुतेक गोष्टी साध्या होत्या, जुन्या होत्या परंतु जुन्याच गोष्टी बदलत्या परिस्थितीत व अडचणीच्या वेळी पुन्हा प्रभावीपणे सांगणे व पटवून देणे थोर व्यक्तीचे कार्य असते, ते गांधींनी केले; याशिवाय सर्वोदय समाजाची शास्त्रशुद्ध कल्पना लोकांपुढे मांडणे, साधेपणा, विकेंद्रीकरण यांचे सामाजिक जीवनात मूलभूत महत्त्व विशद करणे व सामान्य माणसाची माणुसकी व स्वाभिमान जागृत करणे या विशेष गोष्टी गांधींनी केल्या. गांधींची ही शिकवण सुशिक्षितांनी स्वतः समजून घेऊन इतरांस समजावून दिली असती तर फार काम झाले असते. अजूनही सुशिक्षितांनी हे करावे व आपले शिक्षण स्वतःस व इतरास समाधान देऊ शकते व प्रगतीपथावर ठेवते हे दाखवावे.














डॉ. वसंत स. जोशी

## 'सरस्वती महाला'तील —

# 'रामायणा'वरील उपलब्ध मराठी रचना

श्री एकनाथकृत 'भावार्थ रामायणाचा' अभ्यास करीत असताना तंजावर येथे जाण्याचा योग आला. 'भावार्थ रामायणा'च्या हस्तलिखित प्रतींचा शोध घेत असतानाच तेथील 'सरस्वती महाला'त अनेक मराठी कवींनी 'रामायणा'वर केलेली रचनाही आढळली. त्यातील काहींचा क्वचित् परिचय मराठी वाचकांना आहे; परंतु अन्य कवींची रचना उपेक्षित, दुर्लक्षित राहिली आहे. आजपर्यंत मराठीत साळया रसाळ, एकनाथ, वामन पंडित, आनंद तनय, माधवस्वामी, नागेश, विठ्ठल, गोसावी नंदन, अनंतकवी, वेणाबाई, निरंजन माधव इ. कवींनी केलेली 'रामायणा'वरील रचना ज्ञात आहे. तंजावर येथील 'सरस्वती महाला'तील विविध कवींच्या 'रामायणा'वरील रचनेचा परामर्शही मराठी वाङमयेतिहासाकारांना घ्यावा लागेल. तंजावर येथे मला उपलब्ध झालेल्या अशा रचनांचा थोडक्यात परिचय येथे करून देत आहे : यावरून रामोपासनेचा संप्रदाय तर स्पष्ट होईलच; परंतु या दैवताच्या अवतारकार्यासंबंधी विविध दृष्टिकोनही स्पष्ट होऊ शकतील. ( ग्रंथनामापूर्वी दिलेले आकडे ग्रंथालयातील बाडांचे क्रमांक आहेत ).

१. ( ९८६. ) **अनंत वाल्मीकि रामायण** : हा ग्रंथ मेरुस्वामी या कवीचा आहे. याचे आज फक्त ६ सर्ग उपलब्ध असून त्यातील एकूण श्लोकसंख्या ९४४ इतकी आहे. सुरवातीच्या तिसऱ्या ओवीत कवी स्वतःचा उल्लेख 'अनंत मौनि मेरू' असा करतो. उपलब्ध असलेल्या सर्गांत कवीचे स्वतःविषयीचे उल्लेख पुढीलप्रमाणे आढळतात.

विश्वात्मा तो ऐसा अनंत मौनि विश्राम
मेरू अंतर्भाव पूर्ण प्रचीतिचा काम ॥ ४ ॥
इति श्री मदनंत वाल्मिक रामायणे .... ( सर्ग १६. )
अखंडासि भेटतो अखंडित । म्हणे मेरू अनंत पंडित ॥ ( सर्ग १७. )

अनुक्रमणिका








पुरुष मनोहर अनंत मौनी मेरु देत जिव्हाळा– सर्ग १८.
श्रीरामसमर्थ श्री अनंत कीर्ती पाठक
मेरु दिनकर मुद्रा जयजयति निर्धारे ॥२५॥
कर्पुराचा मेरु अज्ञान अग्निसंधानी
अनंत मौनी ग्रंथ मनोहर निर्भव तो धानी– सर्ग १५.

या ग्रंथाचा कवी पुढीलप्रमाणेही उल्लेख करतो :–

'मेरु बालकांडे उद्यानविलास हरिहर नाटकारंभनाम
षोडशदशमस्सर्गः' – सर्ग १६.
पाहावे ते द्रिष्टी हरिहर नाटक रूपे ॥५॥ सर्ग १५
हरिहर नाटक आजि पहावे ॥६॥ सर्ग १५.

ही सर्व रचना विविध वृत्तांची व पदांची आहे. काही कटावही आहेत. परंतु एकंदरीत रचना क्लिष्ट व नीरस वाटते.

## २. (८९३.) अद्भुतकांड रामायण – शेष.

शेष हा तंजावरकडील विपुल रचना करणारा एक कवी आहे. याच्या नावावर श्री पांडुरंग महात्म्य, तुलसी महात्म्य, तंजपुरी महात्म्य, हालास्य महात्म्य, डोलोत्सव गीत आणि एकनाथकृत भावार्थ रामायणाचे उत्तरकांड इतक्या रचना आढळतात. तंजावरचे राजे प्रतापसिंह यांचा पुत्र अमरसिंह यांच्या कारकीर्दीत म्हणजे १७८६ ते १७९८ या काळात या शेषकवीने आपली काव्यरचना केलेली असावी. या राजाचा उल्लेख त्याने आपल्या 'तंजपुरी महात्म्य' नावाच्या ग्रंथात केलेला आहे. इतर काही ग्रंथांत त्याने स्वतःचा उल्लेख कोनेरीसुत शेष असा केला आहे. हा शिवभक्त होता आणि तंजावर येथील वृहदीश्वर मंदिराचे व तेथील अनेक विधींचे त्याने आपल्या 'तंजपुरी महात्म्य' या ग्रंथात बारकाव्याचे वर्णन केले आहे. प्रस्तुत 'अद्भुतकांड रामायणात'त त्याने आपली माहिती पुढीलप्रमाणे दिली आहे :–

मेदिनीकर कुलसंभव। रुक्मांगद पुत्र ज्ञान विभव
गंगाधराख्य अभिनव। जया सद्भाव श्री रामचंद्री ॥४५॥
श्री शिवरामेंद्र योगिवर। तदनुग्रहीत दयासागर
रुक्मसुत म्हणती ज्यासि थोर। लक्ष्मी नृसिंहपर सदा ॥४६॥
तयाचा श्री अभय हस्त। माझिया माथा सदावर्तत
तो जैसा बोलवीत। तैसा बोलत मी जाणा ॥४७॥

अनुक्रमणिका

येथे मीपणासि नाही ठावो। बोलविता सद्‌गुरुरावो
सर्व साक्षी रघुपुंगवो। जाणे भावो शेष म्हणे ॥४८॥

या ‘ अद्‌भुतकांड रामायणा’चे आज तीन प्रसंग उपलब्ध आहेत व त्यांची ओवीसंख्या १७५ इतकी आहे. वाल्मिकि ऋषी आपला शिष्य भरद्वाज यास शतकोटि रामायणांची त्रिभुवनात वाटणी झाल्याचे सांगतात व त्याच्यासाठी ‘ अद्‌भुतकांड रामायण । आठवे कांड हे पावन । सांगत आहेत ’ अशी कल्पना कवीने केली आहे. त्याच्या इतर कृतींप्रमाणेच अद्‌भुत कथा सांगण्याची कवीची आवड येथेही दिसून येते. श्रीमती स्वयंवर, सीताजन्म, सहस्रमुखरावणवध आदि कथा मोठ्या चवीने कवीने या काव्यात मांडल्या आहेत. हजीरी, उमाट, बोहरी अंतुरी, पवाडे असे कित्येक संमिश्र शब्द या काव्यात आढळतात.

या ग्रंथाच्या शेवटी कवीने आपले मनोगत पुढीलप्रमाणे व्यक्त केले आहे. श्रोते व वक्ता यांचा हा एक सुखसंवाद आहे.

मग सुखे राज्यपालन । करू लागला रघुनंदन
एवं अद्‌भुतकांड रामायण । कथिले पावन संक्षेपे ॥३८॥
जे जे कामना धरोनि चित्ती । हे श्रवण पठण केल्या जगती
ते ते मनोरथ सीतापती । शीघ्रगती पुरविता होय ॥३९॥
म्हणोनि वाल्मिकी मुनी। सांगे भरद्वाजा लागोनी
श्रोते हो ऐका सावध मनी। संग्रहोनि ते म्या कथिले ॥४३॥
कां तरी तुम्ही संतसाधू । साच जनी करुणासिंधू
पाहता तुमचा श्रवणादर विधू । उचंबळे बोधू मजचकोरा ॥४१॥
तुमच्या श्रवणादरामृतपाने । तृप्त जाहलो मी तेणे
उद्‌गार निघती पावन। सत्तासुलक्षण हे तुमची ॥ ४२ ॥
तुमचे तूम्हासि निवेदिले। मी पण नाही येथे उरले
सद्‌गुरु कृपे ऐसे घडले । तत्त्व आतुडले अवचट ॥४३॥
गुरुकृपा जयाचिये माथा। तया कैंची भव व्यथा
ऐशिया तया सद्‌गुरुनाथा । वंदू आता सद्‌भावे ॥ ४४ ॥

३. (क्र. १०२५ व १०३७) भावार्थ रामायण : उत्तर कांड — कवि शेष

याच कोनेरीसुत शेष या कवीची आजवर अज्ञात व अप्रकाशित असलेली एक रचना मी प्रकाशात आणली आहे. एकनाथांच्या भावार्थ रामायणातील उत्तरकांड लिहिण्याचा प्रयत्न वेगवेगळ्या कवींकडून झाला व अशी हे धरून चार उत्तरकांडे मराठीमध्ये उपलब्ध झाली आहेत. या उत्तर कांडाची रचना ‘ एका

जर्नादना शरण ' या मुद्रिकेनेच झालेली असली तरी चौथ्या अध्यायाच्या शेवटची ओवी या ग्रंथाच्या मूळ कर्त्याचे नाव उघड करते. ही ओवी अशी आहे :—

एका जर्नादना शरण। त्याचे कृपेचे अवलोकन
तेणे करून शेष रंक धन्य। वंशोद्धारण गुरुकृपा ॥११९॥

अशाच तऱ्हेचा उल्लेख या शेष कवीने आपल्या इतर कृतीतूनही केलेला आहे. [ यासंबंधीचा माझा 'तंजावरस्थ कवि शेषकृत भावार्थ रामायणाचे चौथे अज्ञात उत्तरकांड ' हा लेख पाहावा. 'नवभारत' जून १९६६. ]

या उत्तरकांडाचे १६ प्रसंग असून एकूण ओवीसंख्या २०२६ इतकी आहे. हे उत्तरकांड रचताना घेतलेल्या वेगवेगळ्या आधारांचा उल्लेख कवीने केला आहे. मुख्यतः शिवरामायण, अध्यात्म रामायण यांचा आधार तो घेतो. 'रामरक्षे'चे महात्म्य रामाच्या तोंडूनच वदवून कवीने कालविपर्यास केला आहे. संक्षेप आणि विस्तार शक्य त्या ठिकाणी तो करतो. काही ठिकाणी मूळ कथानकात त्याने बदलही केले आहेत. एकनाथांनी सांगितलेल्या 'दंडकारण्या'च्या कथेपेक्षा वेगळीच कथा या शेष कवीने सांगितली आहे. श्री एकनाथांप्रमाणे आधी संस्कृत श्लोक देऊन त्यावर टीका करण्याची पद्धत या ठिकाणी अनुसरलेली नाही. छाया सीतेची हकीगत कवी सांगतो. लवांकुशाशी झालेल्या युद्धाचे वर्णन त्याने थोडक्यात आटोपते घेतले आहे. सीतेकडे पुन्हा अग्निदिव्य मागितल्यानंतर त्याप्रमाणे सीता ते दिव्य करते. अग्नी तिच्या शुद्धतेची ग्वाही देतो व नंतर तिची अंतःपुरात पाठवणी होते. परंतु कैकेयीने पुन्हा आक्षेप घेतल्यानंतर व रामाने अग्निदिव्याची मागणी केल्यानंतर मात्र भूमिप्रवेश करते, असा वेगळा कथाभाग कवीने सांगितला आहे. कवीने रामकथेची उत्पत्ती शेवटच्या प्रसंगात अशी दिली आहे : 'ही रामकथा प्रथम नारदाने सांगितली. ती विश्वामित्राने ऐकली. नंतर ती वसिष्ठां-कडून वाल्मिकीस समजली. ब्रह्मदेवाने या कथेवर पाचशे श्लोक रचले आणि व्यासानी ही कथा ऐकून ती अष्टादशपुराणात घातली.'

हा सर्व कथाभाग सांगत असताना सुबोध निवेदन पद्धतीचा कवीने अवलंब केला आहे. कल्पनाचमत्कृती किंवा प्रतिभाविलास फारसा आढळत नाही. श्रोत्यांच्या आग्रहावरून बाराव्या प्रसंगात त्याने केलेले श्रीरामाचे आध्यात्मिक वर्णन मात्र सरस व कवीच्या रामभक्तीचा प्रत्यय आणून देणारे आहे.

४ (९९५) अंगद शिष्टाई — कृष्णदास मुद्गल.

हे सुटे तीन प्रसंगाचे काव्य आहे; परंतु त्याची सुरवात व शेवट पाहता ते स्वतंत्र काव्य नसून कृष्णदास मुद्गलांच्या युद्धकांडातील अध्यायच वेगळे केलेले

असावेत असे वाटते. पोथीचा कागद व अक्षर जुनाट वळणाचे असून भाषाही जुनी वाटते. चरणाच्या शेवटी उभ्या दंडाऐवजी दोन उभी टिंबे : देण्याची पद्धत या पोथीत अवलंबिलेली आहे. उपमादृष्टान्तादिकांनी विषय खूप सजविला आहे. शैली आकर्षक व ओघवती आहे. एक नमुना येथे देतो –

असता पालथिया घटावरी : पडला थेंबुटा तो न थंबे :
दुग्धाचे आधणी घातला गोटा: तो न ये पाकाते ८८
निंब वृक्षासी बांधले आळे : पंचामृते भरले चिरकाळे :
त्यासी अमृततरू यैसी येतील फळे : हेही न घडेची कदा ८९
ईक्षुदंडाची कांडोरी : पीळती पाण्याचे उदरी :
परी रसु न थंबेची भीतरी : वाहातुची गेला ९०
यैसी अंगदाची शब्दशिष्टाई : असाधारण बोलीला ते समई :
परी रावणु ने घे हृदई : गोचीडक्षीर जैसा ९१.

## ५ ( ११४० ) सुलोचना अग्निप्रवेश : कृष्णदास मुद्गल

हे प्रकरणसुद्धा कृष्णदासाच्या मूळ युद्धकांडातून वेगळे केलेले आहे. याच्या शेवटी पुढीलप्रमाणे उल्लेख आहे :

इति श्री युद्धकांड सुधारसु । पूर्ण सुलोचनेचा आग्नी प्रवेसु ।
वीनवी मुद्गल कृष्णदासु। ×××

कृष्णदास मुदगलांचे 'युद्धकांड' किती लोकप्रिय होते हे या दोन सुटया केलेल्या आख्यानावरून दिसून येते. ही दोन कथानके अतिशय आवडल्यामुळे नित्य वाचनासाठी त्याच्या वेगळ्या प्रती कोणी चाहत्याने केल्या असाव्यात. तत्कालीन वाचकांची अभिरुची व वाचनप्रियता यांचे हे उदाहरण आहे असे म्हणावयास हरकत नाही.

## ६ ( ११२७ ) श्रीरामकृपाविलास : कवी मुकुंद

भक्ती आणि अध्यात्म यांनी भरलेले हे भाष्य मुकुंद नावाच्या कवीने लिहिलेले आहे. या कवीचा काळ, लेखनस्थळ वा इतर चरित्रविषयक माहिती उपलब्ध नाही. सर्व कथेचे स्वरूप भगवद्भजनाचे आहे. श्रीरामास उद्देशून प्रत्येक ठिकाणी कवी बोलतो आहे. रचनेमध्ये परिपक्वता दिसून येत नाही. अंत:करणाचा जिव्हाळा मात्र जाणवण्यासारखा आहे. या काव्याचे फक्त बालकांडच उपलब्ध असून त्यात १८ उल्हास आहेत व ओवीसंख्या १५९० इतकी आहे.

या ग्रंथाच्या सुरवातीस कवी म्हणतो –

श्रीरामा मज तुझे लागले ध्यान। वर्णितो हे तव कृपेचे विधान
श्रीरामकृपाविलास अभिधान। ग्रंथासि सावधान परिसोत श्रोते ॥ २॥

श्रीरामाचा अनुग्रह आपल्यावर आहे अशी कवीची श्रद्धा आहे. पहिल्या उल्हासातील ३२ व्या ओवीत तो म्हणतो,

श्रीरामा आलासि भासते चित्ती। हे महद्भाग्य असे माझे संचिती
हाचि अर्थु साधु श्रोते निश्चिती। परिसोत सप्रीती मुकुंद म्हणे ॥

श्रीरामाच्या चिंतनानेच जणु त्याला काव्यरचनेचे सामर्थ्य प्राप्त झाले आहे. 'श्रीरामा तुज चिंतोनि ध्यानी। म्या बाळे बाळकांड ऐसे विधानी। हे वर्णिले देवा तव सन्निधानी। केले अनुसंधानी उल्हास अठरा ॥ ३९' या कथेचे महात्म्य कवीने पुढील शब्दात सांगितले आहे :

श्रीरामा तव कथा जे सुरसाची। की तेच जाण चिद्गंगा पीयूषाची
तू बाप कृपाब्धि हे सरिता साची। माउली निजदासांची मुकुंद म्हणे ॥ ४२ ॥

७ ( ११२६ ) शतमुखरावण कथा : भूपतिनाथ

हे एक छोटेसे १३४ ओव्यांचे काव्य आहे. 'हनुमन्नाटका 'च्या आधारे कवीने यातील कथाभाग सांगितला आहे. सद्गुरुच्या कृपेने ही रचना आपण करू शकलो असा भाव सुरवातीच्या ओवीत त्याने व्यक्त केला आहे. ( सद्गुरु कृपा वसंत काळ। मन अरामि माजता प्रबळ। श्रीरामकथा जिव्हा कोकिळ। मधुर स्वरे आलापी ॥ १ ॥ ) भाषा साधी व प्रवाही आहे. या काव्याच्या अखेरीस कवी म्हणतो.

हे हनुमंत नाटकाची कथा। मऱ्हाष्ट्र भाषे यथार्थ उलथा विश्वतोमुखे झाला वक्ता। म्हणउनी सिद्धी पावली ॥ १३३ ॥ संतांचेनि आज्ञाशब्दे। भूपतीनाथे कृपाप्रसादे। सुरस साहित्य वोविया प्रबंधे। निरोपण संपूर्ण ॥ १३४ ॥ इति हनुमंत नाटके शतमुख रावणकथा समाप्तमस्तु ॥

याच्या शैलीचा एक नमुना:–

तिहि झगटोनि शतकंधरि। सिरे उडविली गगनोदरि। गरगरा भेदोन चक्राकारि। उलथोनि पडिली अवनीये ॥ १११ ॥ चाप यंत्रोनि शत यंत्रगोळ। उसळोनि येके येकचि मौळ। उडविता शतशीर्ष प्राणजळ। आटोनि गेले निःशेष ॥ ११२ ॥ मातला राक्षस जोन्हाळा। म्हणोन

स्वकरे नाराचविला । घेऊन शक्तीने येकेच वेळा। शतसिर कणिसे
कापिली ॥ ११३ ॥

८. ( ११७४ ) अश्वमेधी कुशलवोपाख्यान – दादोसुत मुद्गल

जैमिनीकृत 'अश्वमेधा'तील कुशलवोपाख्यानाचा हा मराठी अवतार आहे. ( इति श्री भारत कथा अश्वमेधी । जयमिनीकृत नासी भवनाधी । श्रोते हो सेवा तुम्ही आधी । दादोसुत मुद्गल म्हणे ॥ १३३ ॥ ) या ग्रंथाचा कर्ता दादोसुत मुद्गल हा असून तो एकनाथांचा समकालीन होता. प्रस्तुत ग्रंथ शके १५०० मध्ये पूर्ण झाला. याचा कालोल्लेख पुढीलप्रमाणे आहे :–

सौभाग्य येणे नाम नगरी । पुण्यतोय मुचकुंदेच्या तिरी
शके पंधरासे निर्धारी । ग्रंथ संपविला ॥ १५१ ॥
सकळास आधार भवसागरी । या लागी सर्वधारी संवत्सरी
कथा समाप्त जाली अवधारी । - - - - - = ॥ १५२ ॥
ज्येष्टमासी संपविली । सौम्यवासर ॥ १५३ ॥
तिथि होती द्वादशी । कथा संपविली ते काळी ॥ १५४ ॥

दादोसुत मुद्गलाने आपल्या गुरूचे नाव नरसिंह असे दिले आहे. त्याच्या आईचे नाव काशी. आपल्या मातेची थोरवी दादोसुताने मोठ्या प्रेमाने गाइली आहे. ग्रंथाच्या आरंभी गणेश, शारदा, गुरु व श्रोते यांची कवीने स्तुती केली असून त्यांच्या आशीर्वादाची याचना केली आहे. या ग्रंथाची ओवीसंख्या एकूण ३७७६ इतकी असून त्याचे २८ प्रसंग आहेत. हे प्रसंग अठ्ठावीसच का याची कल्पना देताना कवी म्हणतो, '६ शास्त्रे ४ वेद व १८ पुराणे मिळून २८ होतात. तसेच २१ स्वर्ग व ७ पाताळे मिळून २८ होतात. म्हणून येथील प्रसंगसंख्याही २८ आहे.'

दादोसुत मुद्गलाच्या काव्यात त्याच्याच काळात लेखन करणाऱ्या एकनाथांच्या व कृष्णदास मुद्गलाच्या काव्याचे पडसाद उमटलेले आहेत. संस्कृत व मराठी यांच्या श्रेष्ठतेचा वाद या काळातही ताजाच होता. मराठीची तरफदारी करताना दादोसुत मुद्गल म्हणतो,

म्हणाल संस्कृत वाणी सुरांची । तऱ्ही मऱ्हाष्ट भाषा नव्हे तस्कराची
जेथे कथा वर्ते रघुनाथाची । तेचि सार सर्व शास्त्री ॥ १९३ ॥

या ठिकाणी एकनाथांच्या 'गीर्वाणवाणी देवे केली । प्राकृत काय चोरापासोन जाली' या प्रसिद्ध उक्तीची आठवण होणे साहजिक आहे.

अनुक्रमणिका

श्रोता व वक्ता यांचे सामरस्य झाले तरच काव्यरसाला उधाण येते, यासंबंधीचे विवेचन कृष्णदास मुद्गलाने आपल्या 'रामायण युद्धकाण्डा'त केले आहे. प्रस्तुत 'कुशलवोपाख्याना'त अगदी याच थाटाचे वर्णन दादोसुत मुद्गलाने केले आहे.

तैसी कथा सुरस परम गहन। उपमा अर्थगौरव अतिसंपन्न
परि श्रोतयाचे दुश्चित मन। तरि ते व्यर्थचि गेले ॥

९. ( २२२४ ) सीतास्वयंवर – चिंतामणि :

हे एक छोटेसे आर्यावृत्तातील काव्य आहे. 'सरस्वती महाला'तील एका वहीत हे उतरून घेण्यात आलेले आहे. यातील एकूण आर्या ९० आहेत. श्री रामचरित्र गायनाचा ध्यास लागल्यामुळे ही छोटीशी रचना कवीने केलेली दिसते. शेवटच्या आर्येत कवी म्हणतो,

मग तो निर्विघ्नपणे सवधु श्रीराम पावला गावा
गावा ध्यावा वाटे हाचि मला सत्स्वभाव लागावा ॥ ९० ॥
काव्याच्या शेवटी 'इति श्री ज्योतिर्विद्राजसूनु चिंतामणि विरचितः सीतास्वयंवरः समाप्तः' असा उल्लेख आहे.

१०. ( १०७१ ) श्रीरामहास्यवदन – माधव.

हे २३ ओव्यांचे छोटेसे प्रकरण आहे. मोठ्या ग्रंथांतून ते वेगळे केलेले असावे असे वाटते. श्रीरामाच्या हास्याचे आध्यात्मिक वर्णन कवीने याठिकाणी केले आहे. रचना भक्तिपूर्ण आहे. सुरवात अशी आहे.

श्रीराम समर्थ। शोभे रामाचे हास्यवदन।
सर्व अवेवेसी राजमान। त्रैलोक्य हर्ष येकवटोन।
राघव आनन जाले नेणो ॥ १ ॥

शेवट पुढीलप्रमाणे करण्यात आला आहे—

अैसा मतीचा राम कोवळा। भद्री शोभे घनसावळा।
ज्याचे शिरी मुकुट पोवळा। तो ध्यानी आवळा भावार्थानले ॥ २३ ॥
इति श्री माधवकृत रामहास्यवदन संपूर्णमस्तु ॥

११. ( १०६१. ) श्रीरामदिनचर्या – प्रतापसिंह राजेंद्र

तंजावरचे अधिपती प्रतापसिंह राजे यांनी रामचरित्रावर रचलेले हे काव्य आहे. मराठी आणि संस्कृत भाषांवर त्यांचे चांगले प्रभुत्व होते. प्रस्तुत काव्यात बऱ्याच ठिकाणी संस्कृतप्रचुर रचना झालेली आहे ( उदा :– श्रृंगारी प्रभु तीसही

कतिपयः स्वोत्पन्नधर्मान्वये ) हे काव्य श्लोकबद्ध असून त्यात विविध वृत्तांचा वापर करण्यात आला आहे. या काव्याचा प्रारंभ पुढील श्लोकाने होतो–

अधिकता सकळाहुनि ज्या अति
नमिन थोर अगोधरि ज्या प्रति
त्रिभुवनाधिक अद्वय राम हा
प्रणमिला म्हणुनी नियमे सदा ॥ १ ॥

या काव्याचे एकूण तीन सर्ग असून त्यातील एकूण ओवीसंख्या १०४२ इतकी आहे. प्रत्येक सर्गाचे शेवटी पुढील मुद्रा आढळते :–

श्रीरामदीनचर्या हे विभवोशम जे माहा
प्रतापसिंह राजऋषि प्रपोतायासि तो माहा ॥ ३३ ॥ सर्ग १.

१२. ( १०१२ ) भरतभेटी– नामा पाठक

मराठीतील ‘ अश्वमेध ’ कर्त्या नामा पाठकांचे हे काव्य आहे. याचे एकूण तीन प्रसंग असून एकंदर ओवीसंख्या ३०८ इतकी आहे. नामा पाठकाचा निश्चित काळ अद्यापि विवाद्य आहे. तथापि प्रस्तुत काव्याची प्रत शके १६२२ मध्ये तंजावरकडील रत्नाकर कवीने केलेली आहे. या काव्याचे शेवटी हा प्रतलेखक म्हणतो,

शके सोळासे आणि बाविस । विक्रम संवछर अति सुरस ।
वैशाख वद्य दशमीस । दोप्रहरी लेखनासमाप्ति । १.
चोळ मंडळी कावेरी तिर । असे प्रसीद्ध नामे चंदाऊर.
ते स्थळी हे भरतभेटिचे सार । रत्नाकरे लिहिलेसे २.
श्रोते हो ऐकावि विनति । ग्रंथु लिहिला यथाप्रति
न्युन पुर्ण महंति । लिखिता दोषु न ठेविजे ३.

नामा पाठकाने चित्रित केलेला हा भरतभेटीचा प्रसंग राम वनवासास गेल्यानंतरचा नसून श्रीराम वनवास संपवून परत आल्यानंतरचा आहे. राम येत असल्याबद्दलचा निरोप घेऊन आधी हनुमंत भरताकडे येतो. याठिकाणी भरताची प्रथमच भेट झाल्याचे कवीने दाखविले आहे. लक्ष्मणास शक्ती लागली तेव्हा त्याच्यासाठी द्रोणागिरी आणण्यास जाताना या दोघांची भेट झाल्याचा उल्लेख नाही.

नामा पाठकाने लिहिलेल्या या प्रकरणास ‘ शिव रामायणा’चा आधार असावा असे तिसऱ्या प्रसंगातील पुढील निर्देशावरून वाटते. ‘ शंभु म्हणे शैल्यबाळे । तुज होताति श्रवणसुखाचे डोहाळे ।

अनुक्रमणिका

परी वाचा वो पांगुळे । बोलावया ते भेटी ५.

नामा पाठकाने रामायणावर आणखीही रचना केली असावी असे पुढील उल्लेखावरून म्हणता येईल. या काव्याच्या शेवटी कवी म्हणतो, '...पुढे ऐका रसाळ ग्रंथु अयोध्या प्रवेषु सांगेन ॥ १३४ ॥' युद्धकांडातील हे तीन प्रसंग आहेत. ग्रंथाची सुरवात पाहता यापूर्वी काही रचना झालेली असावी असे वाटते. गणेश, शारदा, श्रोते यांना याठिकाणी वंदन करण्यात आलेले नाही. पूर्वीचे कथानुसंधानच पुढे चालविल्याचे दिसून येते. यावरून नामा पाठकाने कदाचित् संपूर्ण रामायणावरही रचना केली असावी असे वाटते. एकनाथांच्या पूर्वीची रामायणावरील रचना यादृष्टीने या काव्यास महत्त्व आहे.

या काव्यात कवीचे भक्तिपूर्ण अंतःकरण प्रत्ययास येते. रामनामस्मरणाचे सुख अनुभविण्यासाठीच त्याने या काव्याची रचना केली आहे. सुरवातीस तो म्हणतो,

रामकथेचे आरत बहुत । तेणे उत्कंठित माझे चित्त । राम नाम
हे प्रेम अद्भुत । तेणे जीवित्व सुफळे १. सुफळ संसारू जाहला ।
वाचेसि श्रीरामु आला । जन्म मरणा अंतरला । उद्धरिला भवसिंधु २.
तुज विनंती करीन आता । तुज शरण जालो गा रघुनाथा । हृदइ
राहावि रामकथा । वाचेसि राम असावा ३. हेचि द्यावे जी जिवन ।
श्रोते व्हावे जी सावधान । तेणे पुण्ये पावन । विनवि नामा पाठकु ४.

नामा पाठकाच्या शैलीची कल्पना देणारे काही उतारे येथे देतो —

१ वानराना श्रीरामाने प्रेमाने निरोप दिल्यानंतर—

रत्नाचे हार घेति । बाही मणकटि बांधति । कटि तटि वेढिति । कास घालिति माळगंटी ४३ येक आभरणे झेलीती । येक तोडुनिया टाकिती । येक डोइस बांधिति । जडित कंकणे कळाविया ४४. येक गोपुर माडियावरी येक हिंडति राज्य मंदिरी । येक भोंवर पलंगावरी । निद्रा करीताति सुखे ॥ ४५ ॥ प्रसंग १.

२ रामाची भेट झाल्यानंतर भरताने त्याला

चित्तवृत्ति वोवाळिला । मन सुमनि पुजियेला । प्रेमरसे वोवाळिला । भक्तीरसे करूनि १०२. अवक्षेसी नुगवे चांदिणे । आणि ग्रीस्मरूतेचे काळी । मेघु वोले आवकाळी । तेथे चातक पक्षकुळी । सुख पसरूनि राहिले १०३. कि रुत नसता वसंतु । कि कोकिळास उल्हास हेतु । कि अवकाळी मेघ

गर्जतु। तेथ नाचति मयोरे १०४. कि नसता योग्याचा अभ्यासु। नेणति सेवि जो ब्रह्मरसु। तो समारंभाचा संतोषु। प्रेमरसु बोळला १०५

३ शेवटी पसायदान मागताना कवी म्हणतो –

परि मज प्रसादु होवा ऐसा। जेव्हा राम नामी ठसा। आखंड चिंतन मानसा। हे परमपुरुषा मज द्यावे १३२. भलते कुळि उपजावे ॥ रघुनाथाचे स्मरण असो द्यावे। ऐसे माझे ठाइ राहावे। निरंतर हृदइ १३३. कर जोडुनि विनवितु। पाठक नामा शरणांगतु। पुढे ऐका रसाळ ग्रंथु। अयोध्या प्रवेशु सांगेन १०४.

१४. ( १०५८ ) मुळकासुर वध– विष्णुदास नामा

मराठीमध्ये महाभारताची रचना करणाऱ्या विष्णुदास नाम्याचे हे काव्य आहे. यात पाच प्रसंग असून ओवीसंख्या ४२९ आहे. विष्णुदास नाम्याची रामायणावरील ही अज्ञात व अप्रकाशित अशी रचना आहे. मुळकासुराच्या आख्यानावर विष्णुदास नाम्याने हे आख्यान लिहिलेले आहे. संपूर्ण रामायणावर त्याने रचना केलेली असावी असे प्रस्तुत काव्यावरून तरी वाटत नाही. या आख्यानाला जैमिनी अश्वमेधाचा आधार असावा असे पुढील उल्लेखावरून वाटते.

आता जयेमुनि म्हने जन्मोजया। तया मुळकासुराचि जे भार्या
कोन गति होईल त्या अभिप्राया। सांगे नामा विष्णुदासु ॥ ८० ॥ प्र.४
जयेमुनि म्हने जन्मोजया। रामकथा संपुर्न येथुनिया
विष्णुदास नामा म्हने श्रोतया। प्रेमभावे आईकिजे ॥ ९६. प्र. ५. )

रावणवधानंतर सीतेच्या हातून झालेले मुळकासुरवधाचे कार्य वर्णिण्यात दुष्ट निर्दालनाचे श्रीरामाचे कार्य अद्यापि संपलेले नाही अशीच कवीची समजूत आहे असे वाटते. या काव्यलेखनाचा व रामावताराचा हेतू सांगणाऱ्या पुढील ओव्या या संदर्भात अभ्यसनीय आहेत.

सभेमध्ये बसले असताना श्रीराम त्याच्या राज्यातील हकीगत बिभीषणास विचारतात. कुंभकर्णाच्या पुत्राने महाप्रलय मांडल्याचे सांगून पुढे तो म्हणतो,

माहापापी तो राक्षेसु। तेने बहु केला त्रासु। देवधर्माचा विध्वंसु।
केला हो राघवा ॥ ४ ॥ देवाईले मोडिलि। तुळसि वृंदावणे
तोडिलि। हरिकीर्तणे मोडिलि। विप्र दुःखि केले ॥ ५ ॥
मोडलिया चित्रसाळा। मोडलिया धर्मशाळा। मोडलिया अन्नशाळा।
लोक दुखि केले ॥ ६ ॥

विष्णुदास नाम्याच्या काळाचे यथार्थ दर्शन या ओव्यातून होते.

बिभीषणाकडून हा वृत्तांत ऐकल्यानंतर सैन्यासह श्रीराम लंकेकडे निघाले. वानरासह श्रीराम समुद्रतीरावर येताच समुद्राला हर्ष झाला. या समुद्रतीरावरचे 'फिरंगी' रामाच्या दर्शनास येतात व त्यांना इथे सुखाने राहण्यास राम सांगतात, हा उल्लेख कालविपर्यासाचा असला तरी कवीच्या काळात या फिरंग्यांचे आगमन झाले असावे असे सुचविणारा आहे. ( तव समुद्रिचे बाळ-मार्गी। रामा भेटी आले फिरंगी। म्हनति रामा तु निजयोगी। धरणि-धरुही ॥ १२ ॥ अशी त्यांनी रामाची स्तुती आरंभिली. तेव्हा रामाना भक्ती मानवली व ते म्हणाले, 'तुम्हि माझे सखे येथार्थी। भेटो आलेति आमुचे प्रीति। तरि आता असा सुखे ॥ १३ ॥ ) अशाच तऱ्हेचा कालविपर्यास पाचव्या प्रसंगात राम आपली भेट गोकुळात होईल' असे सांगतात तेव्हा होतो.

विष्णुदास नाम्याच्या शैलीचे दर्शन पुढील भागावरून होण्यासारखे आहे. मुळकासुर युद्धास निघाला, तेव्हा 'आडवा भुजंग गेला। मार्ग खंडितु ॥ २१ ॥ नग्न कुमारि देखिली। सेक सन्मुख जालि। ××' असे अपशकुन होतात. मुळकासुराचे विष्णुदास नाम्याने केलेले वर्णन व एकनाथांनी राक्षसांचे केलेले वर्णन यातील साम्य लक्षणीय आहे. मुळकासुराचे वर्णन करताना कवी म्हणतो, 'दाढा दिसति विकटा। पींगटा दिसती बाबर झोटा। माहाथोर विशाल मोठा। डोळे गुंजावर्न ॥२३॥ विवेचनाच्या ओघात 'म्हणौनि गर्व सर्वथा न किजे। अहंकारू अवघा सांडिजे। हिनपने असि जे। ईश्वर स्मरूनि ॥५९. प्र. ५.) असा उपदेशही तो करतो.

मुळकासुराशी युद्ध करण्याकरिता कास घालून, हा धनुष्यबाण घेऊन सीता हनुमंताचे खांद्यावर उभी राहिली. त्यावेळी हनुमंताने भुभुःकार करताच

> पाताळि धाकु पडिला। शेषु चळवळिला। समुद्र खळबळिला। तेने घोशे ॥४७॥ धनुशा बोढि काढिली। तेने सप्त पाताळे खवळिली। स्वर्गे एकविस डळमळिली। हालवलि पृथ्वि ॥४८॥ चंद्रसुर्यें धाकिनले। सर्व लोक बोचकले। धूमंडळ खळबळिले। म्हनति काये जाले॥ ४९. प्र. ४.॥

सीतेने मुळकासुराचा वध केला. आपला जय झाल्याचे पाहून वानर

> 'येक पोटे पीटिति। येक अतोतो म्हनति। येक भेने लपति। पाहावया दृष्टि ॥ ७० ॥

या ग्रंथाची फलश्रुवी कवी अशी सांगतो.

> अैसि हे रामकथा पवित्र । जे आईकति ते नित्यमुक्त । भवदु:खाचे आवर्त्त । तया न लगति जान ॥९५ प्र. ५॥

भाषेच्या दृष्टीने काही शब्दप्रयोग तिचे जुनेपण दर्शवितात.

> ‘लंके माजि हडबड जालि,’ भुलि पडली, धाड आली, फरारी, धेंडि, झोट धरति, तव गजबजिले वानर, अवश्वरु, बोभाटु, निरुता, विडा उचलिला, मावेचा, चौदा चौकड्याचे राज्य, परवडी, आरोगिती सवदळी, संबोखणा, वोसावलि, चोज, वोचकला, वोढि, पेने केले इ. इ.

## १५. अभंगबद्ध अध्यात्म रामायण: हंसदास राघव.

हे एक शिलाप्रेसवर छापलेले काव्य तंजावर येथे पाहावयास मिळाले. श्री. रावजी श्रीधर गोंधळेकर यांनी ते ४ नवंबर १८७८ ई मध्ये प्रसिद्ध केले आहे. ‘हा ग्रंथ हंसस्वामींनी शिष्य राघवदास याजकडून तयार करविला’ असे ग्रंथारंभी म्हटले असले तरी ग्रंथात तसा उल्लेख आढळत नाही. मात्र कवीने सारी रचना ‘हंसदास राघव’ या नावानेच लेलेली आहे,

ही सर्व अभंगात्मक रचना आहे. उत्तरकांड लिहिलेले नाही. ‘उत्तरकांड शोकयुक्त असल्यामुळे त्याजवर अभंग केले नाहीत’ असा खुलासा प्रकाशकांनी प्रस्तावनेत केला आहे. सुरवातीच्या सहा कांडातील एकूण अभंगसंख्या ६०१ इतकी आहे. बालकांडाच्या सुरवातीस कवी म्हणतो, ‘बालकांड सार व्यासादि वर्णित। रामायण युक्त गायिले ते ॥ ७॥

तेचि गुरुराये अभंगरूपाने । सिद्धि नेले म्हणें हंसदास”

‘इति श्रीमत्सकल बुधवरद हंसदास राघव विरचितं बालकांड अभंग-व्याख्या शतकं संपूर्ण.

आध्यात्मिक दृष्टिकोनातून रामचरित्राचे गायन कवीने केले आहे. रचना साधी सोपी आहे. अभंगरूपाने रामायण रचना करण्याचा हंसदास राघवांचा हा प्रयत्न अभिनव असाच आहे. या कवीसंबंधी प्रकाशकानी प्रस्तावनेत पुढील-प्रमाणे माहिती दिली आहे :—

‘यांचे नाव नारायणराव असून हे शेवाळे, इलाखा मोगलाई येथील राहणारे असून देशस्थ आश्वलायन ब्राह्मण होते. यांचा जन्म शालिवाहन शक १७२८ सात झाला आणि शके १७७७ त समाधिस्थ झाले. यांची समाधी परांडा इलाखा मोगलाई येथे आहे. इतक्या कालात कृत्ये केली ती–

लहानपणापासून सुबुद्धी असून सत्यवर्तन होते व हे गृहस्थ असून कारकुनीचे हुद्यापासून पुढे फडणिशीच्या हुद्यावर गेले. नंतर त्याजला आत्मज्ञान होऊन आपण कृतार्थ व्हावे अशी इच्छा असल्यामुळे साधुसंत वगैरे कोणी आढले की त्याजकडे जाऊन त्यांचे दर्शन आणि कृतार्थतेविषयी विचारण्याचा क्रम होता. काही काळाने एका परमहंस स्वामीची गाठ पडल्यावर त्यानी यास लक्ष्मणराव मामलेदार नावाच्या गृहस्थावर पत्र देऊन त्याजकडे तुम्ही जा म्हणजे ते तुम्हास ज्ञानोपदेश देऊन कृतार्थ करितील. याप्रमाणे स्वामीनी सांगून दिलेले पत्र घेऊन त्याजकडे गेले. नंतर दोन तीन वर्षे त्यांचा समागम करून त्यांची कृपा संपादन केली. नंतर त्यांचे आज्ञेने तीर्थाटनास निघाले ते पंढरीस येऊन तेथे काही दिवस राहून तेथेच चतुर्थाश्रम परमहंस दीक्षा घेतली. नंतर पुढे परांडा येथे राहिले. त्यावेळी त्यानी जे ग्रंथ लिहिले ते येणेप्रमाणे—

| | | |
|---|---|---|
| १. शिवगीतेवरील वेदेश्वरी नावाची टीका. | | |
| २. अनुभवसिद्ध आगमसार | ओ. | ३५००. |
| ३. कथाकल्पलता | ओ. | १२०००. |
| ४. ईशावाक्य उपनिषदावर टीका | ओ. | ५००. |
| ५. संकेत कुबडी | ओ. | १५००. |
| ६. चूडालाख्यान अभंगबद्ध. | | २२००. |
| ७. वेदनावाचीं पदे | | १००. |
| ८. रामायणावरील अभंग व किरकोळ स्फुट अभंग | | ३५०० |

## १६. श्लोकबद्ध रामायण — माधवस्वामी

तिरुवेळंदूरचे सुप्रसिद्ध मराठी कवी माधवस्वामी यांची रामायणावरील ही श्लोकबद्ध रचना आहे. युद्धकांडाअखेरच रचना झालेली आहे व त्यातील एकूण श्लोकसंख्या ७२६ इतकी आहे. माधवस्वामी हे रामदास संप्रदायातील असल्यामुळे त्या पंथात असलेले 'अकरा' या संख्येचे महात्म्य या काव्यातही त्यानी कायम ठविले. आहे. एका चरणात ते म्हणतात.

'अक्रामागे सर्व सासष्टि अक्रा' म्हणजे ६६ × ११ = ७२६.

युद्धकांडांच्या अखेरीस कवीने थोडक्यात आपली माहिति पुढीलप्रमाणे दिली आहे.

गौरी मयोरा निकटीच पाहो
त्रिवंद्रुरि माधव वस्ति ते हो
कावेरजा उत्तर भाग कांठी
श्रीरामगेहि दिन नित्य लोटी ॥२५८॥

ग्रंथरचनेच्या बाबतीत माधवस्वामी व सुप्रसिद्ध कवी मुक्तेश्वर या दोघांत साम्य दिसते. दोघांनीही महाभारताची मराठीमध्ये रचना केलेली आहे; परंतु ती करण्यापूर्वी त्या दोघांनाही प्रथम श्लोकबद्ध व नंतर ओवीबद्ध रामायणाची रचना केली. ग्रंथरचनेचे प्राथमिक पाठ त्यानी रामायण रचना करूनच घेतलेले दिसतात. माधवस्वामींच्या अनेक कृतींपैकी ‘ महाभारत ’ ही त्यांची प्रचंड कृती आहे. रामायण रचनेनंतर महाभारत रचनेकडे वळल्याचा उल्लेख त्यानी त्यांच्या महाभारत वनपर्वाच्या पहिल्याच अध्यायात केला आहे. त्याठिकाणी माधवस्वामी म्हणतात,

सप्तकांड तुझे चरित्र । वाल्मीकाचे निजवक्त्र
रामायण वर्णिता विचित्र । अतृप्त श्रोत्र धोतयांचे ॥२२॥
त्या सप्तकांडाची टीका मराठी । करिता तृप्ति न बाणे माझेही पोटी ।
पुनः वर्णावया आवडी उठी । लाळ पोटी निजमन ॥२३॥
त्यास्तव करावया भारत । म्या मनी धरले आरत ॥२५॥

माधस्वामीची महाभारताची संपूर्ण रचना आज उत्तम स्थितीत उपलब्ध आहे. मुक्तेश्वरकृत महाभारताची पांचच पर्वे उपलब्ध झाली असून इतर पर्वांसाठी अनेक संशोधकांनी सतत प्रयत्न केले असतानाही दुर्दैवाने अद्यापि ती मिळू शकली नाहीत.

माधवस्वामींची संपूर्ण ओवीबद्ध रामायण रचनाही उपलब्ध आहे. तिचा व माधवस्वामी आणि एकनाथ यांच्या संबंधाचा परिचय पुढे करून देत आहे :

## १७ माधवस्वामींची रामायणरचना

माधवस्वामी हे तंजावरकडील तिरुवेळुंदूर येथील सुप्रसिद्ध कवी. यांच्या रामायण व भारतावरच्या रचना प्रसिद्ध आहेत. ‘ भावार्थ रामायण ’ कर्ते श्री एकनाथ यांच्या मुलीचा मुलगा असे या भागात मानले जाते व तशी वंशावळही ‘ सरस्वती महाला ’त उपलब्ध आहे. एकनाथांच्या या मुलीचे या भागात माहीत असलेले नांव उमा असे आहे. एकनाथ व माधवस्वामी यांच्या संबंधाबाबत डॉ. शं. गो. तुळपुळे यानी त्यानी संपादिलेल्या माधवस्वामीकृत ‘ योगवासिष्ठा ’च्या प्रस्तावनेत ऊहापोह केलेलाच आहे. तंजावरकडील पुरावा या कवीचा एकनाथाशी

संबंध जोडणारा आहे. तथापि उलट बाजूने तसाच पुरावा अद्यापि उपलब्ध झालेला नसल्यामुळे हा विषय अद्यापि संशोधनाचा राहिला आहे. माधवस्वामींचा नातू वासुदेव पंडित याने श्रीमद्‌भागवताच्या नवम स्कंधावर टीका रचिली आहे. या ग्रंथाच्या प्रारंभी त्यांनी संत एकनाथांचे स्तवन केले आहे. या ठिकाणी ते म्हणतात,

तो अस्मत्कुलभूषण । तदनुग्रहे मद्वंशपावन
तेणे देउनी कन्यारत्न । वंश नूतन वाढविला ।। ५१ ।।
आणि प्रकृतिहुनि जो पर्त्ता । जेथे नसे गुणत्रयाची वार्ता
श्रीकृष्ण नामाते जो धर्ता । चराचर पूर्ता जो होय ।। ५२ ।।
तयाची दिव्य मंगळमूर्ती । कन्यादान समई अतिप्रीती
अर्पिता होय नागनाथाप्रती । भावे निश्चिति एकनाथ ।। ५३ ।।
तयाचिया कृपाबळे । निपजली प्रबन्ध कमळे
मद्वंशी अति तुंबळे । जे केवळ श्लाघ्य जनी ।। ५४ ।।
तैसिया जाण एकनाथा । कोणती परवडी देऊ आता
तच्चरणी ठेवितो माथा । जाण तत्वता सर्वकाळ ।। ५५ ।।
जीवाचे करूनि निंबलोण । वोवाळीन एकनाथाचे चरण
कृतार्थ आत्मा मानीन तेणे । लाभेन केणे भक्तीचे ।।। ५६ ।।
जयाचा पितामह माधव । तो जाण साक्षाद्रमाधव
जेणे भारतादि ग्रंथ अभिनव । केले राघव प्रसादे ।। ५७ ।।
मल्लारी महात्म्य गणेशपुराण । योगवासिष्ठ विष्णुपुराण
आदिकाव्य श्रीमद्रामायण करी विचक्षण भाषाबद्ध ।। ५८ ।।
जया प्रसवली साक्षात् उमा । पिता विश्वनाथ ज्याचा ।।

अष्टमस्कंधामध्येही वासुदेव पंडितानी एकनाथाना ‘अस्मत्कुलभूषण’ असे गौरवून उल्लेखिले आहे.

या माधवस्वामींची रामायणावरील संपूर्ण रचना उपलब्ध असून तिची एकूण ओवीसंख्या १७२९० इतकी आहे. माधवस्वामींनी आपल्या रचनेला किष्किंधा कांडापासून सुरवात केली. राम–हनुमान भेटीच्या महत्त्वामुळे रामदासाप्रमाणे माधवस्वामीनीही येथूनच सुरवात केलेली दिसते. प्रथम किष्किंधाकांड व नंतर सुंदरकांड, उत्तरकांड, बालकांड, अयोध्याकांड व सर्वात शेवटी अरण्य-कांड असा त्यांच्या रचनेचा क्रम दिसतो. ( प्रथम केले किष्किंधा कांड । त्या-उपरी सुंदरकांड ; त्यानंतर उत्तरकांड । बालकांड त्यापाठी ।। ४६ ।। उपरी केले

अनुक्रमणिका

अयोध्याकांड । सकळा शेवटी हे आरण्यकांड । यापुरी युद्धकांड। केले काही दिवसा ।। ४७ ।। )

शके १५१६ मध्ये ही रचना पूर्ण झाली. ‘श्रीमुखनाम संवत्सर । वैशाख कृष्ण द्वितीया गुरुवार । ते दिवशी ग्रंथ संपला प्रहर । दिवस जाला होता ।। ४५ ।। अशी नोंद स्वतः कवीने केली आहे. लेखनस्थळाची माहिती देताना कवी म्हणतो,

कुंभकोण प्रसिद्ध काशीपर्यंत । तो प्रांतसमीप श्वेतारण्य ।। ४१ ।।
प्रख्यात जे का गौरीमायोर । त्या समीपची त्रिवदूर ।
उभय ग्रामामध्ये नीर । प्रवाहे कावेरीचे ।। ४२ ।।
त्या कावेरीचे वामभागी सुंदर । लघु देवालय मनोहर ।
माजि लक्ष्मण सीतेसी रघुवीर । वस्ती करी जगदात्मा ।। ४३ ।।
त्याचिये सन्निध रामायण । सप्तकांड जाहले संपूर्ण
प्रतिदिनी प्रसंग । पूर्ण होत आला ।। ४४ ।।

आपण रासदासी परंपरेतील असून राघवदास हे आमचे गुरु अशीही माहीती कवी देतो. ( रामदास प्रसिद्ध भूमि । त्याची परंपरा आम्ही । गुरु परमसत्कर्मी । राघवदास ।। ४८ ।। )

माधस्वामीकृत रामायणाचा प्रचंड विस्तार ध्यानात घेता त्याची एकनाथांच्या भावार्थ रामायणाशी तुलना करणे अशक्य वाटल्याने फक्त बाल-कांडाचा परामर्श घेण्याचे येथे ठरविले आहे. रामायणाच्या इतर कांडातील वक्त्याचे आत्मनिवेदनपर उद्‌गार व कथाविषय यासंबंधीचा परामर्श सुरवातीस घेऊ.

नवीन ग्रंथलेखनाची सुरवात म्हणून किष्किंधा कांडाच्या सुरवातीस माधवस्वामीनी गणेश व शारदा यांना वंदन केले आहे. आणि लागलीच कथाभागाला सुरवात केली आहे. किष्किंधा काडांची सुरवात म्हणजेच रामायण रचनचा प्रारंभ असल्याने त्याच्या सुरवातीच्या ओव्या उद्‌धृत करतो :—

ॐ नमोजी विघ्न नाशका । भक्त चकोर चित्र तोषका
पुर्णचंद्रा तूं कविचातका । होसि यथार्थ जलधर ।।१।।
नमु सरस्वति जगन्माता । अवित्पन्ना हृदई जीचि सत्ता ।
प्रवेशलिया सुरगुरुसितत्त्वता । उणीव आणी साहित्ये ।।२।।
नमु सद्‌गुरु मोक्षपाणी । जेणे ज्ञानबोध सुर्यकिरणी

आज्ञान तमाचि गवसणी। लया नेलि तात्काळ ॥३॥
त्याचे व्हावया उत्तिर्ण। न देखे मि पदार्थ कवण।
म्हणोनि देशसहित पंचप्राण। वोपीले चरणी तयांचे ॥४॥
आता भाविक प्रेमळ श्रोते। त्यासि प्रार्थितो जोडिले हस्ते
सावध करोनि येकाग्र चित्ते। कीजे कथा श्रवण ॥५॥

या कांडाच्या शेवटी, जाले किष्किंदा कांड समाप्त। वाल्मिकि बोलीला तोचि अर्थ। महाराष्ट्र भाषे कवीला यथार्थ। माधव म्हणे' असे कवी म्हणतो.

रामकथेचे महात्म्य सांगणारे उत्तरकांड व युद्धकांडातील उतारे पुढे देत आहे :–

१) जन्माख्य रघुनाचरित्र। कथा संपुर्ण जालि विचित्र
श्रवण मात्रे पातकी पवित्र। होतील निःसंदेह ॥५१॥
श्लोक श्लोकार्ध अथवा चरण। येक येक अक्षर पुंण्यपावन
सद्भावे अैकिलिया क्षाळण। होय महापातकांचे ॥५२॥
जे नित्य पढतील भक्ति। ते मायादुर्ग मोहशक्ति
लंघुनि पावतिल मुक्ति। सायोज्यता ॥५३॥
आणिकही मनकामना। धर्म आर्थ काम मोक्ष जाणा
जे इछीतील ते रामायणा। पासाव फळ पावतील ॥५४॥
हे आदिकाव्य रुषिनिर्मित। पुरा बोलिजे वाल्मिककृत
महाराष्ट्रे कथाया तोचि अर्थ। अर्त्त होते मानसी ॥५५॥
तंव कोण्हि येक दिवसी स्वप्न। देखिले जे करि रामायणे
तदनंतर सप्तकांडे संपुर्ण। जाली श्रीराम म्हणे ॥५६॥
मी नेणेचि वित्पत्ति लाघव। आरुष बोलण्याची माझी ठेव
मानेल तरि परिसा माधव। श्रोतयांसि म्हणे ॥५७॥

उत्तरकांड अध्याय २९

या काव्याची फलश्रुती सांगतांना माधवस्वामींनी त्याच्या निर्मितीची प्ररणाही येथे सांगून टाकली आहे 'मराठी भाषेत रामायणरचना करण्याची मनात इच्छा होताच आणि स्वप्नामध्येही तसा आदेश झाल्यामुळे ही रचना आपण केली. आपल्याकडे पांडित्य व्युत्पन्नता नाही हे कवीचे उद्‌गार त्याच्या विनयाचे निदर्शक आहेत. 'भावार्थ रामायणा'ची रचना करताना श्री एकनाथानी काढलेल्या उद्‌गाराशी माधवस्वामींच्या या विचारांचे साम्य जाणकारास जाणवल्याखेरीज राहणार नाही.

२) जाले युद्धकांड संपुर्ण । श्रवणें नासती दोष दारुण
आणि विमल होय अंतःकर्ण । परमार्थ विषइ ॥१२५॥
धनवृधी धान्यवृधी । यषवृधी कीर्ती वृधी
पुण्यवृधी प्रजावृधी । होय येणे ॥१२६॥
नासे संकट अपाय विघ्न । होती रणांगणी अरिभग्न ।
यास्तव क्षेत्रिये अखंड मग्न । असावे रामायणि ॥१२७॥
असो हा महिमा अपार । जाणवी अनुभवी नर
आता समुळ ग्रंथ विस्तार । प्रसंग किती ते ऐका ॥१२८॥
सप्तकांड रामायण सांग । दोनिसे विस प्रसंग
यास येकादशे देता भाग । विंशतिटाल तुटे ॥१२९॥
येणे कैसी वचने जाडे । माझे बोलणे अत्यंत साबडे
गुणदोष चतुर प्रौढे । न ठेवावा सर्वथा ॥ १३० ॥
सहस्राचा स्वयंपाक येकी । करिणारि तिची न धरावी चुकी ।
जे लवण कोण्ही येक शाकी । नाहि मिनले म्हणोनि ॥ १३१ ॥
घ्यावा विंशाश गुण अवरि । तेवि ये रामायण सागरि
अपार शब्दाचि भरोवरि । परोपरि पाहाता ॥ १३२ ॥
त्यागाजि असल्या वेग शब्द । त्याचा न मनावा विशद
वीनवी माधव करारविंद । जोडुनि स्रोतया प्रति ॥ १३३ ॥

युद्धकांड : अध्याय ७९.

माधवस्वामींनी आपले श्लोकबद्ध रामायण युद्धकांडापर्यंतच लिहिलेले आहे; परंतु या ओवीबद्ध रामायणाची त्यांनी सातही कांडे लिहिली आहेत. 'अकरा' या संख्येचे श्लोकबद्ध रामायणात त्यांनी सांगितलेले वैशिष्टच दोनशेवीस अध्याय रचून येथेहि कायम ठेवलेले आहे. 'धनवृधी धान्यवृधी' या चरणात रामदासांच्या 'मारुति स्तोत्रा'तील 'धनधान्य पशुवृद्धि' या चरणाचा पडसाद ऐकू येतो.

बालकांडाचा थोडक्यात परिचय :

या बालकांडात अेकूण १८ प्रसंग असून त्यात १७२० ओव्या आहेत.

प्रसंग – १

| | | | |
|---|---|---|---|
| गणेशस्तवन | ओवी १ | ते | १३. |
| शारदास्तवन | ,, १४ | ते | २२ |
| सद्गुरुस्तवन | ,, २३ | ते | ३०. |
| श्रोतृवंदन | ,, ३१ | ते | ४०. |

सुरवातीला हे विषय येतात आणि नंतर कवी रामायण रचनेची पार्श्वभूमी सांगतो.

पुर्वी नारदे वाल्मीकी । उपदेशिले शतश्लोकी
ते बालरामायण लोकी । बोलिजे प्रसिध ॥ ४१ ॥

नारदाकडून रामचरित्र ऐकल्यानंतर गणेशाच्या आशीर्वादाने वाल्मीकीने रामायण रचनेस सुरवात केली व सात कांडे पूर्ण केली. याच प्रसंगात क्रौंचमिथुन व वाल्मीकिकृत श्लोकाच्या प्रसंगाची हकीगतही आली आहे. – ओव्या ७१.

**प्रसंग २**

प्रारंभी फक्त 'श्रीरामकर्ता' असा उल्लेख.

– पुत्रप्राप्तीसाठी अश्वमेध यज्ञ करण्याची दशरथाची इच्छा व त्याची सिद्धता याची हकीगत.

– अयोध्या नगरीची प्रजा व व्यवस्था यांचे विस्तारपूर्ण वर्णन ओव्या १ ते ३०. 'देवदेवालये सिखरे । ध्वजा गोपुरे मखरे । सप्त नव खण दामोदरे । नानापरीची ॥ ३ ॥ अनेक सरोवरे पट्टणामधी । भव्य विस्तीर्ण राजबिदी । कुंचे दुकाने सांदासांदी । मंडप मनोहर ॥ ४ ॥ .... पाचि पेरोज प्रवाळे । हिरे माणिके मुक्ताफळे । आणीकही रत्ने सुढाळे सकळां ग्रही संपुर्ण ॥ ६ ॥

तत्कालीन सामाजिक स्थितीचे वर्णन करताना कवी म्हणतो– 'अल्प-मोलाचे घोंगडे वस्त्र । कोणाचे शरीरी नसे ॥ २१ ॥ – ओव्या ७३.

**प्रसंग ३ –**

ऋष्यशृंग गंडक ऋषीना ( स्त्रियाना ) भेटण्यास आतुर– सूर्य उगवला तरी 'अझुनि टळेचि ना थेरडा । काय निमित्य ॥ २२ ॥' असे त्याला झाले. स्त्रियांनी ऋष्यशृंगाला मोहात गुंतवून नेले. या निमित्ताने कवी स्त्रियांवर कोरडे ओढतो– स्त्रिया म्हणजे महामोहाचे भुवन, पातकस्थान, विषतरुवर, अनाचार सागर, पर लोकास विघ्न, धर्मन्याया करी भग्न, हितास बाधा. स्त्री म्हणजे चिता, लक्ष योनी तिच्यामुळे भ्रमाव्या लागतात अशा तऱ्हेचे वर्णन । ओवी ३१ ते ३८ ) तो करतो.

ऋष्यशृंगाच्या आगमनाने पर्जन्यवृष्टी होते. दशरथ आपली कन्या शांता त्याला देतो.

दशरथाचा यज्ञ व दान समर्पण– त्याला चार पुत्र होतील असा ऋष्य-शृंगाचा वर.

ओव्या ८४.

प्रसंग ४ –

रावण भयापासून मुक्त करण्याची देवांची विष्णूस प्रार्थना अग्नीमध्ये दिव्यरुप घेऊन विष्णू दशरथास पायस देतो.

ब्रह्माने जांबवंत, नळ, हनुमंत आदि वानरांची निर्मिती केली, ती हकीगत– मर्कटचेष्टा ओ. ४० ते ४३.

दशरथ पत्न्याना पुत्रप्राप्ती. अयोध्येत आनंद.

दानधर्म– विप्री माथा वाहिल्या मोटा। भारे न चलवेचि वाटा।
कित्तेकांचा फीटला कासोटा। तो अवरावा कोणे ॥ छ ॥
विश्वामित्राचे आगमन. –ओव्या ८६.

प्रसंग ५ –

दशरथाकडे विश्वामित्र रामाची मागणी करतात. त्याने नकार देताच 'ग्रंथि पाडिलि दोही भ्रुगुटी। नेत्र ताविले जैसा अगिटी। सिरा ताणोनिया हस्तकंटी। बोलता जाहला ॥ ३४॥ वसिष्ठ ऋषींच्या सांगण्यावरून राम व लक्ष्मण यांना दशरथ विश्वामित्राकडे सोपवितो. ओव्या ६४.

प्रसंग ६ –

राम व लक्ष्मण विश्वामित्रासमवेत– कामाश्रमास आगमन. मदनदहनाच्या प्रसंगाचा उल्लेख – ताटिका वध. विश्वामित्राकडून राम लक्ष्मणांना विविध अस्त्रांचे शिक्षण. ओव्या ८३.

प्रसंग ७ –

सिद्धाश्रम–बळी व शुक्र यांची कथा– सुबाहु मरिची यांचा यज्ञावर हल्ला त्यांचा वध– सोमदेवसुत ब्रह्मदत्त त्याच्या शतकन्यका राघवास दिल्या (?) ओव्या ८३.

प्रसंग ८ –

कुशनाभे कन्या सुंदरा। अर्पिल्या चालिसशी कुमरा १०. पार्वतीचे आख्यान तारकासुर कार्तिकेयाचा जन्म– दैत्यांवर विजय. ओव्या ५५.

प्रसंग ९ –

सगरपुत्रांचा नाश– सगरही परलोकास गेला – ओव्या ७८.

प्रसंग १० –

भगीरथ प्रयत्नाने गंगावतरण व सगरपुत्रांचा उद्धार.

स्कंद आणि गंगा आख्यान । अैकतील जे येकाग्र मने ।
त्यांचे उद्धरतील पितृगण । होईल स्वर्गप्राप्ती ॥ ६० ॥ ओव्या ६३.

प्रसंग ११ –

– विशालपट्टणाची माहिती विश्वामित्र रामलक्ष्मणाना देतात.
– समुद्रमंथनाची कथा – उद्दालिकाचा ज्येष्ठेशी विवाह.
समीप जाहले निजस्थान । तेथे रुषी ब्राह्मण साधु जन ।
नाना मंत्रोपचारी देवतार्चन । करिती विध्योक्त ॥ २८ ॥ तुळसी वृंदावने मनोहर । दीप पाजळती अपार । ताळ शंख जेंगटे सुंदर । वाजती ठाई ठाई ॥ २९ ॥ मोहिनी कथा. ओव्या १०६.

प्रसंग १२ –

अहिल्येला गौतमाचा शाप व रामाकडून अहिल्योद्धार - वसिष्ठाश्रमात आगमन ओव्या ७५.

प्रसंग १३ –

वसिष्ठाश्रमात स्वागत व भोजन– कामधेनूची कथा विश्वामित्राच्या वसिष्ठद्वेषाची हकीगत ओव्या ८५.

प्रसंग १४ –

त्रिशंकूची कथा. ओव्या ७५.

प्रसंग १५ –

विश्वामित्राच्या चरित्रातील घटना या दोन तीन अध्यायातून सांगितल्या आहेत. येथे मेनका– विश्वामित्राची कथा.– विश्वामित्राची खडतर तपश्चर्या. – वसिष्ठानी 'ब्रह्म ऋषि' म्हटल्यानंतर विश्वामित्रास संतोष. ओव्या १०७.

प्रसंग १६

देवराताची - त्रिंबक धनुष्याची कथा - ते धनुष्य जनकाज्ञेनुसार आणताना 'गुण चढउनि वोढिता जुनाट । मध्यस्थानी कडकडाट । धनुष्य भंगले धडधडाट । कोसळले गिरीते ॥३०॥

रामाने शिवधनुर्भंग केला. रावण येथे आलेला आहे. हा कथाभाग कवी मुद्दाम सांगतो. त्याच्या अंगावर धनुष्य कोसळले, तेव्हा

'तेणे लंकानाथ लोटला भुमी। दाह वदनी अशुद्धवमी । मज प्राणदान द्याहो अंतर्यामी। पावतो म्हणे वेथा ॥५०॥ तेव्हा विश्वामित्र आज्ञे करुनी ।

रामें पदांगुष्ठे च्याप काढुनी। द्विखंड केले हे स्कंदपुराणी। बोलिले असे ॥५१॥ आता अग्रकथा सावधपणे। श्रोती परिसिजे येकाग्र मने...’

दशरथ रामविवाहासाठी वऱ्हाड घेऊन निघाला. ‘त्यामागे चालती सुखासने। धमधमा वाजती निशाने। माही मुखे देखुनि मन। जनांची विस्मित ॥७२॥ शंख शृंगे काहळा। जेंगट मृदंग दुटाळा। गिडबिडी मोहरीया विशाला। पणवभेरी ॥७३॥ नफेरी बांका वुरंग। नाना वाद्ये वाजती सुरंग। नाग सर पिणियाचा रंग। अधिकाधिक तुंबळे ॥७४॥ अैसे वऱ्हाड गजरे निघाले। रजे व्योम अछादिले। ×× ॥७५॥

वऱ्हाडाचे जनकाकडे आगमन. —ओव्या ८६

प्रसंग १७

रघुवंशाचे थोडक्यात वर्णन - दशरथ व जनक यांच्या वंशांचे वर्णन - लग्नानिमित्त दशरथाचा दानधर्म – विवाह समारंभ थाटाने पार पडला नंतर सर्वांना भोजन देण्यात आले. त्या भोजन समारंभाचे वर्णन :–

मग समस्तही बैसले हारी। शाका लवण शाकाकुसरी। वाढिल्या वोदन तथा उपरी। वरान्न वटक पात्री ॥१००॥ भक्ष निर्मिले अनेक प्रकारी। नाना कुशलता तथा भीतरी। तेही वाढिले आणि क्षिरी। बहुधा जिनसी ॥१०१॥ घृत घळघळा द्रोणी वोतिती। देखोनि द्विज तोषिले चित्ती। हेम ठाणवया वरि पाजळती। दीप हिरे माणिकांचे ॥१०२॥ मग संकल्प सोडिला जनके। तदनंतरे सकळाही सुखे। प्राणाहुती घेउनि हरिखे। सेउ लागले मिष्टान्ने ॥१०३॥ लाविती लवण शाका तोंडी। भरभरा वरपति कढी। नामघोष घडिघडी। करिती आनंदे ॥१०४॥ भक्ष मोडुनि हस्ती। यथेष्ट घृती भिजविती। ग्रास घेतांचि होती। गुदगुल्या पोटी ॥१०५॥ पात्रीचे अन्न सरोनि पुरे। पुन्हा षड्रस पक्वान्ने भरे। एक म्हणतो पुरे पुरे। कंठमर्याद आले ॥१०६॥ दुग्ध कालउनि क्षीरी। घृतेसी शेविती तृप्ती। वरी तव दधि तक्र वरिच्या वरी। पडो लागले द्रोणी ॥१०७॥ ते करुनि वोदनी मिश्रित। भक्षिता सकळ जाले तृप्त। सुवास जीवने अत्यंत। घेती घळघळा ॥१०८॥ सकळांसि जाले परिपुर्ण। सकळां पात्री उरले अन्न। मग सकळ उत्तरापोशन। घेउनि आले बाहेरी॥१०९॥ खळखळा आंचवले उष्णोदके। दशरथासि उपचारे जनके। क्षणक्षणा तोषविजे पुण्यश्लोके। आणि वसिष्टादिका ॥११०॥ मग अवघे सभेसी

आले। दिव्यासनावरि बैसविले। कुंकुम गंधे रेखिले टिळे। कपाळी सकळांच्या ॥ १११ ॥ शुभ्र चंदनाची दीधली उटी। पुष्पहार घातले कंटी। सुवास धूसरे गोमटी। डौरिलि सर्वां शरीरीं ॥ ११२ ॥ रत्नमाला मुक्तमाला। गंधमाला पुष्पमाला। घातल्या समस्तांच्या गळा। विराजमाना ॥ ११३ ॥ सकर्पुर तांबोल दीधले। ते सकळीही घेतले। प्रवाळा अैसे रंगले। वोष्ट समस्तांचे ॥ ११४ ॥ अैसा च्यारि दिवसवरी। आदर केला बरवीयापरी। मग स्नुषासहीत गजरी। दशरथ चालिला मंदिरा ॥ ११५ ॥ — ओव्या ११७

प्रसंग १८

— जनकाकडून चारी जामाताना आंदण — परशुराम व रामाचे युद्ध — परशुराम रामाज्ञेने निघून जातो. — अयोध्येत सर्वांचे आगमन.

जैसे स्वर्गी निर्जर नांदत। तैसे अयोध्या लोक समस्त।
ईतुकेन जाले समाप्त। बालकांड माधव म्हणे ॥ ९२ ॥ — ओव्या ९२

भावार्थ रामायणाचे बालकांड व माधवस्वामीकृत रामायणाचे बालकांड यांची तुलना करून पाहिल्यास माधवस्वामी मुळास धरूनच अधिक लिहीत असल्याचे दिसून येईल. वऱ्हाडाची मिरवणूक, भोजनप्रसंग इत्यादि ठिकाणी माधवस्वामींनी भर टाकलेली आहे आणि त्यांच्या काळच्या जीवनाचे दर्शनही घडविले आहे; परंतु मूळ रामायण कथेच्या अनुषंगाने इतर ठिकाणच्या कथांचा वापर करून विस्तार करण्याची एकनाथांची पद्धत माधवस्वामींनी स्वीकारलेली दिसत नाही. मूळ रामायणाचा एक नेटका अनुवाद एवढे त्यांच्या काव्याचे वर्णन करता येण्यासारखे आहे. एकनाथांनी मात्र श्रावणाची कथा, दशरथ कैकयी यांचा शुक्राचार्यांशी संग्राम, वसिष्ठाकडून पायस वाटला जात असता त्यातील एक भाग घारीकडून पळवला जाऊन तो अंजनीस मिळून हनुमंताचा जन्म, रामजन्मप्रसंगी लंकेत घडलेला अनर्थ, दशरथ–कौसल्या विवाह अशा अनेक प्रसंगांचा समावेश एकनाथांनी आपल्या कृतीत केला आहे. माधवस्वामी मात्र मुळास सोडून फारसे कुठे भरकटले नाहीत किंवा नवीन प्रसंगनिर्मितीही त्यांनी केलेली नाही. मात्र मुळातील प्रसंगांचे वर्णन थोडे विस्ताराने करीत असताना माधवस्वामी यांच्या काळातील वाद्ये, शस्त्रे आणि भोजनप्रसंग यांची माहिती त्यात आलेली दिसते.

१८ कृष्णदासमुद्‌गलकृत रामायण : युद्धकांड :

ज्या एकाच ग्रंथामुळे कृष्णदास मुद्‌गलाचे नाव मराठी वाङमयात अढळ झाले तो हा ग्रंथ. ही एक रसाळ व प्रसादपूर्ण रचना आहे. या युद्धकांडाचे एकूण ८० प्रसंग आहेत व त्यांतील ओवीसंख्या १०८८२ इतकी आहे.

हा एकनाथ–कालीन होता असे म्हटले जाते : त्याच्या ‘ मुद्‌ल ’ या आडनावामुळे व अत्रिकुलोत्पन्नत्वामुळे श्री. ज. र. आजगावकर यांना तो मुक्तेश्वराच्या कुळातील असावा असे वाटते. हा नाथकालीन असावा, त्याचप्रमाणे त्यांच्या परिसरात राहणारा असून त्याने नाथांचे ग्रंथ वाचलेले असावेत असे या ‘ युद्धकांडा ’ तील काही उल्लेखांवरून वाटते. गोदावरीचा उल्लेखही तो वरचेवर करतो. गोदावरीच्या सप्तमुखाप्रमाणे हे सप्तकांड रामायण आहे असे तो म्हणतो. संस्कृत व मराठी यांच्या संदर्भात कृष्णदास मुद्‌गलाने काढलेले पुढील उद्‌गार त्याचा नाथांशी असलेला परिचय दाखवितात.

महाराष्ट्र म्हणौनि कीती येका । अप्रमाण करिती शब्द जीतुका ।।
परी हे वाल्मिकी काव्याची टीका । विचक्षणी विचारावी ।। १ ।।
गोदावरीची दोन्ही तटाके । संस्कृत मराठी न म्हणावे लोके
.,...... अर्थ एकचि म्हणौनिया ।। २ ।।
संस्कृतवाणी देवे केली । येरे काय चोरापासूनि जाली
असो हे देह अभिमानींयाची बोली । देवाची चालि वेगळीची ।। ३ ।।

या ठिकाणी नाथांच्या ‘ संस्कृत वाणी देवे केली । प्राकृत काय चोरापासोन जाली । बरी असो हे अभिमान भुली । वृथा बोली काय काज ’ या ओवीची स्वाभाविकपणेच आठवण होते व केशवस्वामींनी वर्णिलेला एकनाथांचा आशीर्वाद घेऊन लेखन करणारा कृष्णदास लोळचा तो हाच असावा असे वाटू लागते.*

* महाराष्ट्र सारस्वताच्या पांचव्या आवृत्तीच्या पुरवणीत या कवीविषयी माहिती देताना पृष्ठ ७८० वर डॉ. शं. गो. तुळपुळे म्हणतात,

‘ कृष्णदास लोळचा विषयी विशेष माहिती नाही. परंतु ‘ सारस्वता ’च्या द्वितीयावृत्तीत ‘ कृष्णदास मुद्‌गल लोली ’ विरचित युद्धकांडाची एक प्रत विंचूरचे श्री. ना. ब. कुलकर्णी यांजकडे असल्याचे कै. भावे सांगतात. ( पृ. १३७. ) संशोधकांनी शोध घ्यावा. कदाचित् कृष्णदास मुद्‌गल एकच असून तो लोळी गावचा असण्याचा संभव आहे. कृष्णदास मुद्‌गलाच्या गुरूचे नाव कृष्ण नसून काशीराज असावे असे त्याच्या युद्धकांडातील ‘ श्री गुरुकाशिराजाय नमः ’ या

कृष्णदास मुद्गलानी मूळ वाल्मीकी रामायणाला धरून लेखन केलेले असले तरी काही ठिकाणी वेगळ्या ठिकाणच्या कथाही त्यांनी घेतलेल्या आहेत. वाल्मीकी रामायणाच्याबद्दल तिसऱ्या प्रसंगाच्या शेवटी ते म्हणतात,

वाल्मीक वाणी अमृत वल्ली। बहुते भाग्ये फळास आली
ते हे रसवृत्ती सेवा वहिली। कृष्णदासु मुद्गलु म्हणे ॥ १२८ ॥

परंतु ४७ व्या प्रसंगात त्यांनी 'सुलोचना अग्निप्रवेशा'चा प्रसंग वर्णिला आहे. मुळामध्ये तो नसल्यामुळे श्रोत्यांनी स्वाभाविकपणेच आक्षेप घेतला. एकनाथांनीही आपल्या युद्धकांडात हा प्रसंग रंगविलेला आहे हे ध्यानात घेण्याजोगे आहे. श्रोत्यांच्या आक्षेपाला उत्तर देताना कृष्णदास मुद्गलांनी भावार्थ रामायणाचा नसला तरी 'अग्निपुराणा'चा संदर्भ दिलेला आहे. त्या ठिकाणी श्रोत्यांना उद्देशून ते म्हणतात, 'येथे आक्षेपीजैल श्रोतीजनीं। जे सुलोचना प्रवेशली अग्नि।

ऐसे वाल्मिकाचि वाणी। वदलि नाही मूळ काव्य ॥ १४९ ॥
तरी वाल्मिक वदला नाही ऐसे। म्हणावया कवणा सामर्थ्य असे
शतकोटी ग्रंथ जगी वसे। तो कोणे पै साधिला ॥ १५० ॥
परी प्रस्तुत अग्निपुराणि। साक्षी बोलिला व्यासवचनी
ते न पाहता विचक्षणी। कवित्वा दोष न ठेविजे ॥ १५१ ॥

याठिकाणी कवीची व्युत्पन्नता जशी दिसून येते, त्याचप्रमाणे या शैलीवर असलेली नाथांची गडद छायाही ध्यानात येते.

वर उद्धृत केलेली तिसऱ्या प्रसंगातील ओवी ध्यानात घेतल्यास युद्धकांड रचना ही कृष्णदास मुद्गलांची 'सेवा वहिली'च आहे असे म्हणावे लागते. सुंदरकांड संपून युद्धकांडाची सुरवात झाली असल्याचा उल्लेख जरी त्यांनी केलेला असला

---

उल्लेखावरून वाटते. तसेच 'मागे सुंदरकांड संपविले। आता युद्धकांड आरंभिले' हे उद्गार त्याने रामायणाची मागील कांडेही रचिली असावी असे सुचवितात. (कृष्णदास मुद्गलाचे 'अयोध्याकांड' मिळाल्याचे प्रा. वा. ल. कुलकर्णी (मराठवाडा विद्यापीठ) पत्रद्वारे कळवितात.)

पृ. २४४ वर श्री. भावे– 'याचे ७८ प्रसंग अथवा अध्याय असून याची ग्रंथसंख्या सुमारे दहा हजार आहे. हा कवी पैठण येथील राहणारा. याच्या बापाचे नाव नृसिंह. त्याचे स्वतःचे नाव मुद्गल असून त्याच्या गुरुचे नाव 'कृष्ण' असले पाहिजे. ..... रामायणातील कोणत्याही कांडावर एवढ्या विस्ताराने रचिलेला ग्रंथ मराठीत दुसरा नाही.

तरी मूळ कथेचा एका तऱ्हेने तो संदर्भच आहे. युद्धकांडाच्या पहिल्या अध्यायात नवग्रंथारंभप्रसंगी करावयाची सर्व स्तवने त्यांनी केलेली आहेत व ग्रंथविषयाचा परिचयही करून दिला आहे. मराठी भाषेत आपण रचना करीत आहोत याची त्या काळातील श्रोत्यांची प्रवृत्ती ध्यानात घेऊन, त्यांनी सुरवातीस उत्तरेही दिलेली आहेत.

या युद्धकांडाचा पहिला अध्याय म्हणजे जणू सबंध ग्रंथाची प्रस्तावनाच आहे. मूळ ग्रंथातील विषयाला या अध्यायात कवीने सुरवात केलेली नसून श्रीगणेश, गुरु, श्रोते इ. विषयीची स्तुती त्यात आलेली आहे. वाङ्मयेतिहासाच्या दृष्टीने कृष्णदास मुद्गलांच्या या युद्धकांडाच्या पहिल्या अध्यायाचे महत्त्व निश्चि-तच आहे. श्री. वि. ल. भावे यांनी हे काव्य बऱ्याच वर्षांपूर्वी प्रसिद्ध केल्याचे श्री. आजगावकर सांगतात पण आज ते मुद्रित स्वरूपात उपलब्ध नाही. वानगीदाखल पहिल्या अध्यायातील काही ओव्या उतरून घेत आहे.

[ तंजावरच्या सरस्वती महाल लायब्ररीमध्ये असलेल्या युद्धकांडाच्या प्रतीचा क्रमांक १११४ हा असून पोथीच्या वरच्याच पानावर पुढील मजकूर आहे. ‘ हे पुस्तक श्रीमंत राजे श्री शरभोजी महाराज साहेब यांच्या कारकीर्दीत काशी देशाहून खरीदी करून आणिले अस्से श्री ॥ ’ या अक्षराहून पोथीच्या आतील मजकुराचे हस्ताक्षर वेगळे आहे. ]

कृष्णदास मुद्गलकृत रामायण : युद्धकांड – अध्याय पहिला

गणेशस्तवनानंतर—

परिसा कथा सावधान। रम्य रामायणी गहन। युद्धकांड दोषदहन। चरित्र रघुनाथाचे ॥ ९ ॥ तम नाशे उगवलेन अर्के। तृण काष्टे भस्म होति वाक्ये। तैसे तुझे नामे येथे। नाना विघ्ने नाशती ॥ १० ॥

ऐसिया तुज चिंतामणी। विनवितसे आरुषवाणी। उपजली माझिये अंतःक-रणी। काव्यवृत्ति हे ऐसी ॥ १३ ॥ कवित्व चंद्र षोडशकळी। म्यां मंदत्वे अमावास्ये इछिला बळी। तरि स्फूर्तिबिजेची नव्हाळी। मज दाखवी डोळा ॥ १४ ॥ ऐसा सीद्ध वीनायकु नमिला। तेणे पुर्ण कळा उन्मेष वाढविला ॥ म्हणोनि वाचा सिंधू उचंबळला। नवरसी सर्वथा ॥ १५ ॥...सरस्वती नमन...

...साहित्य सुमनाचे परिमळ । तेथे सुरस विवेकाचे फळ।
आलिया तृप्त होती केवळ। सर्वत्र श्रोते सज्जन ॥ १९ ॥

गुरुस्तवन...

.. ऐसे परिसोनि श्री गुरुराजा। म्हणे पुरे रे स्तुति नृसिंहात्मजा। निर्मळता देखोनि तुझी द्विजा। येत आनंद भरिते ।। ४४ ।।

आता चालवी कथा रामायणी। जैसी शर्करा पचवी सुग्रणी। साहित्य उपमा लालित्य वाणी। श्रोतयांते दाखवी ॥ ४५ ॥ अयकोनि ऐसे गुरूचे वचन। साहिती वीवरो लागे मन। जैसे अमृतवल्ली आले जीवन। राहागट पाटाचेनि पंथे ।। ४६ ।। आता साह्य अंतःकरणे। करूनि श्रोतयाशि विनवणे। कवित्व ज्याचेनि अवधानपणे। पवित्र परिकर होय की ।। ४७ ।। जैसे रानट पक्षी सुक। समर्थागृही करी कौतुक। सुरस अपुर्व मानिति लोक। शब्द परिसोनि त्याचे ।। ४८ ।। बहूत कवी बहुत मुद्रा। साधिती साहित्य सत्य समुद्रा। ते शब्द रत्नपरिक्षिक महींद्रा। परिस अधिक तुम्ही ।। ४९ ।। गुणग्राहीक तुम्ही श्रोते। कवित्व मुद्रे योग्य भोक्ते। गुणनिधी भाव भरिते। सादरी व मागती ।। ५० ।।

यापुढील ७७ ओवीपर्यंत अपूर्व दृष्टान्तांची मालिका कवीने दिली आहे.

असो हे बोलिजे सहज। पूर्वी वदला कविराज। तेचि उचिष्ट कथिता बहु लाज। लाविती महा प्राणि तो ॥ ७८ ।। तरि ते लज्या न लगावया कारणे। वागदेवीने केले पै धावणे। कथा मार्गी चालता हो उणे। पडो नेदी सर्वथा ।। ७९ ।। उपमा साहित्य अर्थ गौरव। तेचि जाणावे शुद्ध मुद्रा कवित्व। ज्याचिये गर्भी जे जे भाव। ते चतुरी निवडूनि घ्यावे ।। ८० ।। ... कवित्वी नाही वित्पत्ती विलासू। तेथ कथेसि कैचा तुंबळ रसू। तरि श्रोता नव्हे उदासू। ऐसे बोलिले पाहिजे ।।८२।।

कथा रामायणी विचित्र। वाराणसी परिस सुक्षेत्र। विचारिता होय पवित्र। गंगेहूनि आगळी ॥ ८५ ।। सुधारसाहूनि गौल्य। क्षीरनीद्धीपरिस खोल। उत्तमा रत्नाहूनि अमोल्य। कथा रामायणी हे ।। ८६ ।। ...

ऐशी हे कथा रामायणी। भक्ति ज्ञानवैराग्यवेणी। प्रयाग वाल्मीकाची वाणी। पुर्वदत्ते प्राप्त होये ।। ९४ ।। तरि या वाल्मीक ऋषीची महिमा। बोलिजे तितुकी अपूर्ण उपमा। जे भविष्य काव्य रघुत्तमा। रामाचे कथिले ।। ९५ ।। महाकाव्य हे अर्थपुष्ट। वाल्मीककृत शिवे मानिले श्रेष्ठ। तेचि परिसा मऱ्हाष्ट्र। भवछेदक सुखदायक ।। ९६ ।। मऱ्हाष्ट्र ऐसे वाटे लोका। परि वाल्मीक काव्याची शुद्ध टीका। येक येक अक्षर आयका। माहापातके नाशती ।। ९७ ।।

... ना ना संस्कृत हे चंद्रमंडळ। मऱ्हाष्ट्र चंद्रिका केवळ। संस्कृत स्वातीचे जळ। मऱ्हाटी मुक्ताफळ ।। १०१ ।। जैसे मथन दध्याचे केले। त्यातूनि नवनीत

निवडिले। तैसे संस्कृतापासूनि जाले। महाष्ट्र कवित्व ।। १०२।। इक्षदंड रसनायकु। शर्करा पाड त्याचाचि पाकु। परि गोडियेचा विचार अधिकु। रसना येकि जाणे ।। १०३।। आमची देशभाषा मऱ्हाटी। वास्तव्य प्रतिष्ठान गोदावटी। म्हणोनि कौतुक व्यसना राहाटी। ऐसी पद्योत्तराची ।। १०४ ।।

. . . . . विचित्र वाल्मीकीने कथिले। मागे सुंदरकांड संपले
आता युद्धकांड आरंभले। जे अपूर्व सप्तकांडामध्ये ।। १०६ ।।
रत्नमाळेचा मधमणी। कि ग्रह समुहामाजि तरणी
तैसे युद्धकांड रामायणी। रसाळ बहुसाल ।। १०७ ।।
रूषेश्वरांची बैसली सभा। सूर्य लोपे त्याचिया प्रभा
कोटिचंद्रसाम्य धवळित शोभा। उजळलीया दाहा दिशा ।।१०८।।
मनेश्रृष्टी मने संहारू। ऐसा एक ऋषेश्वरु
पृथक् पृथक् सांगता होईल विस्तारू। कथा पडेल पाल्हाळी ।।१०९।।
ऐसिया ऋषेश्वराप्रति। वदे वाल्मिकगिरा सरस्वती
तेचि कथा गौरीस उमापति। कैलाशी सांगतू ।।११०।।
ब्रह्मा वदे नारदाजवळी। आणि वासुगी परिसतु पाताळी
तेचि रामकथा भूमंडळी। पवित्र जन परिसती ।।१११।।
इति श्रीरामायण वाल्मिककृत। काव्य युद्धकांड कथामृत
पुढे स्रोते द्यावे चित्त। कृष्णदास मुद्गल म्हणे ।।११२।।

प्रथम सर्ग समाप्त.

कृष्णदास मुद्गलाची ही कृती परिचयाची असली तरी ती आज दुर्मिळ आहे. त्याचेखेरीज अन्य कवींची रामायणावरील ही विविधरचना सुद्धा अभ्यासकांचे चित्त वेधून घेते. रामोपासकांची ही साहित्यसेवा त्या पंथातील वाङ्मयीन परंपरा दर्शविणारी आहे.



प्रा. सुग्राम पुल्ले

# दोन चरित्रनायक : एक तुलना

आद्यचरित्रकाराचा व आद्यगद्यकाराचा मान महानुभावपंथीय म्हाइंभटाकडे जातो. त्याने गद्यातून लिहिलेले लीळाचरित्र ही त्याची मराठी वाङमयाला बहुमोल देणगी आहे. त्याच्या पंथाला तर ती आहेच. हा म्हाइंभट चक्रधरांच्या उत्तरार्धात त्यांच्या सानिध्यात आला. चक्रधरांना वादविवादात पराभूत करण्याच्या भूमिकेने गेला खरा, पण तो स्वतःच निरुत्तर झाला व श्रीचक्रधर स्वामी हे ईश्वरावतार होत अशी त्याला प्रचीती आली. अशा प्रकारे श्रीचक्रधरांच्या अलौकिक व्यक्तिमत्त्वाने प्रभावित होऊन श्रीचक्रधरांच्याच उपदेशानुसार श्रीगोविंदप्रभु हाही परमेश्वरावतारच असल्यामुळे तोही 'मोचक अवतार' आहे असे वाटून म्हाइंभट श्रीगोविंदप्रभूंना अनुसरतो. म्हाइंभट श्रीचक्रधरांऐवजी श्रीगोविंदप्रभूंना अनुसरतो याचे कारण श्रीचक्रधरस्वामींचा मुक्काम सराळच्याच्या ( म्हाइंभट हा सराळे या गावचा राहणारा ) जवळपासच असल्याने त्यांच्याकडे जाऊन त्यांना अनुसरल्यास आपले सासरे आपल्याला स्वामींच्याकडून परत आणून पुन्हा संसारात घालतील ही भीती त्याला होती. म्हाइंभटाचा महानुभाव पंथात प्रवेश ही एक अलौकिक कोटीतली घटना ठरली. म्हाइंभटाने लीळाचरित्रामधून व श्रीगोविंदप्रभुचरित्र किंवा 'ऋद्धिपूरलीळा' मधून आपल्या पंथप्रवक्तचांची चरित्रे लिहून महानुभाव पंथावर व पर्यायाने महाराष्ट्रावर फार मोठे उपकार केले आहेत. अंगी संस्कृत पांडित्य असूनही त्याने ही रचनी मराठी भाषेतून केली हे विशेष होय. ( तसा श्रीचक्रधर व इतर महानुभावीयांचा मराठी भाषेविषयीचा व महाराष्ट्राबद्दलचा अपूर्व अभिमान प्रसिद्ध आहेच ). म्हाइंभटाच्या नावावर असलेल्या ग्रंथरचनेमध्ये लीळाचरित्र आणि श्रीगोविंदप्रभुचरित्र हे दोन चरित्रग्रंथच महत्त्वाचे आहेत. किंबहुना म्हाइंभटाचे खरे कर्तृत्व या दोन ग्रंथरचनेतच दिसून येते. श्रीचक्रधर व श्रीगोविंदप्रभु यांच्या वाङमयीन मूर्तीच जणू त्याने या दोन चरित्रग्रंथातून निर्माण केल्या आहेत.

लीळाचरित्र हा ग्रंथ एकांक, पूर्वार्ध, व उत्तरार्ध या प्रमाणे तीन भागात विभागलेला आहे. चक्रधरांच्या जीवनातील अवतारस्वीकार, शक्तिस्वीकार,

अनुक्रमणिका






नागांबिकेला प्रेमदान, नागदेवाचार्यांचे अनुसरण व शेवटी प्रयाण या प्रमुख घटना वरील तीन भागांत मिळून सांगितलेल्या आहेत. चक्रधर सारखे भ्रमंती करीत. वरील सर्व घटना म्हणजे त्यांच्या जीवनातील अवस्थांतरेच होत. लीळाचरित्रात कालानुक्रमाने चक्रधरांच्या आयुष्यातील विविध घटना एकत्र केल्या गेल्या आहेत. त्याचप्रमाणे 'श्रीगोविंद-प्रभुचरित्रां' मधून चक्रधरांचे गुरू श्रीगोविंदप्रभु यांचे जन्मापासून ते मृत्यूपर्यंतचे आयुष्यातील प्रसंग लीळांच्या रूपाने संग्रहीत केले आहेत. श्रीगोविंदप्रभुचरित्र याला लीळाचरित्र हे नाव नसले तरी त्याचे स्वरूप लीळाचरित्रासारखेच आहे. लीळाचरित्र आणि श्रीगोविंदप्रभुचरित्र यातील लीळांचा तोंडवळा सारखाच आहे. हे दोन्ही चरित्रग्रंथ आठवणींच्या–स्मृतींच्या–लीळांच्या रूपाने निर्माण झालेले आहेत. श्रीचक्रधर व श्रीगोविंदप्रभु हे दोघेही चरित्रनायक महानुभावीयांच्या दृष्टीने प्रत्यक्ष ईश्वरावतार. श्रीचक्रधरांना तर पंथाच्या संदर्भात व महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनाच्या संदर्भात मानाचे स्थान द्यावयास पाहिजे. तत्कालीन स्थितिशील समाजाला व धार्मिक विचाराला चक्रधरांनीच प्रथमतः प्रचंड धक्के दिले. चातुर्वर्ण्य व्यवस्थेवर प्रहार करून, रूढ संकेतास झुगारून देऊन आपल्या प्रभावी विचारप्रणालीने स्थितिशील समाजाला गती देण्याचे महत्त्वपूर्ण कार्य केले. एका नवीन पंथाचे प्रवर्तन केले. चक्रधरांच्या कर्तृत्वानेच महानुभावपंथाचा विस्तार झाला. अनेक धर्मातील अनेक जातीतील अनुयायी त्यांच्या पंथाला येऊन मिळाले. चक्रधर स्वतःला 'जीवोद्धरणाचा अवतार' मानतात. त्यांचे वरील कर्तृत्व ह्या भूमिकेतूनच झाले आहे. श्रीगोविंदप्रभु हे तर प्रत्यक्ष चक्रधरांचे गुरू. गुरूच्या नुसत्या दर्शनाने, एवढेच नव्हे तर 'परमेश्वरपूर' दुरून पाहिल्यानेही त्यांना विलक्षण आनंद व्हायचा. चक्रधरांची गोविंदप्रभु यांच्यावरील निष्ठा, आदराची भावना लीळाचरित्रात ठायी ठायी व्यक्त झाली आहे.

म्हाइंभटानेदेखील चक्रधर–गोविंदप्रभुबद्दलच्या याच निष्ठेतून, आदरातून लीळाचरित्र व श्रीगोविंदप्रभुचरित्र या ग्रंथांचे लेखन केले आहे. चक्रधर-गोविंदप्रभु यांच्या भक्तीतून–चिंतनातून हे लेखन झाले आहे. नामदेव-महिपती यांच्या चरित्र-लेखनामागची प्रेरणा हीच आहे. मात्र म्हाइंभटाने चरित्रलेखन करताना केवळ परमेश्वरभक्तीचे–चिंतनाचे साधन म्हणून चरित्राकडे न पाहता 'मार्गासी उपयोगा जाईल' या भूमिकेतून माहिती गोळा करून चरित्रनायकालाही श्रेष्ठत्व देण्याचा प्रयत्न केला आहे. चक्रधर किंवा गोविंदप्रभु ज्या ज्या ठिकाणी गेले त्या त्या ठिकाणी म्हाइंभट स्वतः गेला. ज्या ज्या शिष्यांना चक्रधर गोविंदप्रभु यांच्याबद्दलची माहिती होती त्या त्या शिष्यांना म्हाइंभट भेटला आणि त्यांच्याकडून माहिती गोळा

केली व चरित्र लिहिले. चक्रधर गोविंदप्रभूंच्या जीवनाचा बारीक सारीक तपशील आपल्या दृष्टीने फारसा महत्त्वाचा वाटत नसला किंवा तो अनावश्यकही वाटला तरी म्हाइंभट जिद्दीने गोळा करतो. लीळाचरित्र किंवा गोविंद-प्रभुचरित्र या चरित्रग्रंथामध्ये अशा अनेक लीळा दाखवून देता येतील की त्या लीळा चक्रधर गोविंदप्रभु यांच्या व्यक्तिमत्वावर फारसा प्रकाश टाकीत नाहीत तरीही त्या लीळा म्हाइंभट गोळा करतो. चक्रधरगोविंद प्रभुबद्दल जेवढी माहिती मिळेल तेवढी टिपून घेण्याचा प्रयत्न करतो. म्हाइंभटाच्या दृष्टीने चक्रधर गोविंदप्रभु हे परमेश्वरावतार आहेत, त्यांच्याबद्दल जो जो तपशील आवश्यक वा अनावश्यक कसाही असो तो तो टिपण्याचा प्रयत्न तो करीत असतो. ह्या अवतारांकडून घडलेले वर्तन लौकिक दृष्टीने कसेही असले तरी ते परमेश्वराकडून घडलेले वर्तन आहे ह्या भक्तिभावनेतून लीळा गोळा करण्यात आल्या आहेत. लीळांच्या बाबतीत म्हाइंभटाच्या दृष्टीने चांगले वाईट असे काहीही नाही. चक्रधर गोविंदप्रभु यांचा दैवी अवतार मानवी रूपाने कसा वागला याचेच दर्शन म्हाइंभटाला घडवावयाचे आहे. म्हणूनच लीळांची निवड करण्यापेक्षा लीळा तपासून घेणे, त्यातील सत्यासत्यता पारखणे हेच म्हाइंभटाच्या दृष्टीने अधिक महत्त्वाचे कार्य आहे. मिळालेल्या माहितीबाबत खरेखोटेपणाची चिकित्सा, सत्या-सत्यतेची पारख म्हाइंभट कशा पद्धतीने करून घ्यायचा यावर प्रकाश टाकणारी एक लीळा स्मृतिस्थळात आहे. लीळेचा मथळा व ती लीळा पुढीलप्रमाणे आहे.

" म्हाइंभटा लीळाश्रवणे भटी लीळाशोधनानुज्ञा "

" मग म्हाइंभटी भटोबासीपुढां अवघे सांगीतले : गोसावी यांचिया लीळा शोधूनि आणिलीया : तिया संवादिलिया : होये ते भटोबास मानिती : नव्हे तेथ म्हणति : हे श्रीमुखीचे शब्द नव्हेति : हे होती : मग म्हाइंभटाने म्हणितले : आध्याचिये अनुभवीचिया तिया उपाध्याते पुसावीया : नाथोचिये अनुभवीचिया तिया नाथोते पुसावीया। साधाचिये अनुभवीचिया तिया साधाते पुसावीया : यैसीयाचि परी जयाचीये अनुभवीचीया तिया तयातेचि पुसावीया : यैसे भटोबासी म्हाइंभटाने विहिले : मग म्हाइंभटबासी तैसेचि करूनि मागिलाचि परी भटोबासी संवादिलिया : मग उत्तरार्ध पूर्वार्ध दोनि विभाग केले : "

जी लीळा ज्याच्या अनुभवाची ती त्यालाच विचारून लिहावयाची आणि श्रीमुखीचे जे शब्द नाहीत ते श्रीमुखी घालावयाचे नाहीत या निष्ठेने हे चरित्रलेखन झाले आहे. हे सगळे पंथीय निष्ठेतून झाले आहे. त्यामुळे लीळाचरित्र काय किंवा गोविंदप्रभुचरित्र काय या ग्रंथातून जे बाहेर आले ते केवळ सत्यच. म्हणून या

लीळांचे सत्यत्व एकत्र धर्मश्रद्धेतून का होईना पारखले गेलेले आहे. शेवटी सत्याकडेच ही लीळा गेलेली दिसून येईल.

लीळाचरित्राच्या निर्मितीसाठी म्हाइंभटाने जी पद्धती स्वीकारली तीच पद्धती श्रीगोविंदप्रभुचरित्रासाठी स्वीकारली. लीळाचरित्राप्रमाणेच नागदेवाचार्यांना श्रीप्रभूंच्या लीळा विचारून त्याचप्रमाणे इतर शिष्यांना व सामान्य जनांना त्यांच्या अनुभवाची लीळा विचारून त्या लिहून घेतल्या. लीळाचरित्राप्रमाणेच मथळे वगैरे देऊन त्यांची व्यवस्थित मांडणी केली आणि श्रीगोविंदप्रभुचरित्र तयार केले. मात्र इथे एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की लीळाचरित्र ह्या ग्रंथाचे लेखन शेवटीकडून प्रारंभाकडे झाले आहे. "मग उत्तरार्ध–पूर्वार्ध दोनि विभाग केले :" याप्रमाणे प्रथम उत्तरार्ध नंतर पूर्वार्ध व सर्वात शेवटी एकांक अशा रीतीने हा ग्रंथ तयार झाला आहे. परंतु लीळाचरित्राचा विचार करताना एकांकाचा विचार पहिल्याने करावा लागतो.

चरित्रनायकाच्या संबंधातल्या लीला गोळा करणे, त्यांची व्यवस्थित मांडणी करणे व सलगता आणणे, अनुक्रम साधणे व त्यांची पंथीयांसाठी निष्ठेने नोंद करून ठेवणे हीच प्रेरणा म्हाइंभटाच्या चरित्रग्रंथ निर्मितीमागे आहे. चक्रधर–गोविंदप्रभूंच्या नितांत श्रद्धेतून ही ग्रंथनिर्मिती झाली आहे. आपण ग्रंथनिर्मिती करीत आहोत या जाणिवेने म्हाइंभट ग्रंथलेखन करीत नाही तर आपले जे गुरु, त्यांच्या लीळा आपण केवळ संग्रहीत करीत आहोत, पंथीयांसाठी त्या उपलब्ध करून देत आहोत हीच म्हाइंभटाची भूमिका आहे. वाङमयनिर्मितीची जाणीव नसतानाही वाङमयनिर्मिती झाली आहे. म्हाइंभटाचे उद्दिष्ट चक्रधर–गोविंदप्रभू यांच्या बारीक सारीक लीळास्मृती यांचा संग्रह करणे हाच आहे. लीळा गोळा करताना त्याने जे परिश्रम घेतले व चिकाटी दाखविली तिला तोड नाही.

सारांश, म्हाइंभटाने लीळाचरित्र निर्मितीसाठी जे परिश्रम घेतले, जी निष्ठा दाखविली, लीळांची सत्यासत्यता जशी पारखून घेतली तशीच निष्ठा, तशीच खात्री व तसेच परिश्रम गोविंदप्रभु-चरित्रनिर्मितीसाठीही घेतले. कमालीच्या अलिप्तपणाने सत्याची चाड बाळगून म्हाइंभटाने लीळा गोळा केल्या. लीळांची भाषा दोन्हीकडेही म्हाइंभटाचीच आहे. भाषेचे अंगभूत सामर्थ्य दोन्ही चरित्रग्रंथांत प्रकट झाले आहे. दोन्ही ग्रंथांतील लीळांचे स्वरूप व तोंडवळा एकच आहे. लीळाचरित्रात चक्रधरांचे जसे जीवनदर्शन घडते तसे श्रीगोविंदप्रभुचरित्रात गोविंदप्रभूंचे जीवनदर्शन घडते. ह्या दोन्ही चरित्रग्रंथांचे लेखन

अनुक्रमणिका

म्हाइंभटाने तितक्याच निष्ठेने व तितक्याच काटेकोरपणे केलेले असून देखील लीळाचरित्रात चक्रधरांच्या व्यक्तिमत्त्वाची चमक जशी दिसून येते तशी चमक श्रीगोविंदप्रभुचरित्रात गोविंदप्रभु यांच्या व्यक्तिमत्वाची दिसून येत नाही. चक्रधरांचे व्यक्तिमत्व जितके उठावदार, जितके प्रत्ययकारी वाटते तितके गोविंदप्रभूंचे वाटत नाही. याचे कारण काय असावे ? एकाच लेखणीतून दोन्ही चरित्रग्रंथ उतरलेले असूनही असे का होते ? यात म्हाइंभटाचा दोष आहे का ? या प्रश्नांचा आपण जेव्हा विचार करतो तेव्हा असे दिसून येते की चक्रधरांचे जीवन जितके विविधपूर्ण व अनेक घटनांनी समृद्ध आहे तितके गोविंदप्रभूंचे नाही. व्यक्तिमत्वात फरक असण्याचे कारण या दोन पुरुषांच्या प्रकृतीत, आचार-विचारात फरक आहे. यात म्हाइंभटाचा दोष नाही. म्हाइंभटाची चरित्रलेखनातली निष्ठा कुठेही कमी पडत नाही.

एका पंथाचे प्रवर्तन करण्याइतपत प्रभावशाली व्यक्तिमत्व चक्रधरांना लाभलेले होते. त्यांच्या बोलण्यातील साध्या साध्या वाक्यातूनही महानुभाव पंथाच्या तत्त्वज्ञानाने व आचारसंहितेने आपले रूप टिपले. त्यांच्या वाणीचे सामर्थ्यच तसे होते. चक्रधर नेहमी सूत्रमय बोलायचे. मूळात चक्रधरांचे व्यक्तिमत्वच अष्टपलू होते. त्यांनी एकसारखी भ्रमंती केली. त्यांच्या जीवनात वेगवेगळ्या गावी वेगवेगळ्या व्यक्तींच्या संबंधात वेगवेगळ्या घटना घडल्या. व्यक्ती, प्रसंग, घटना यांची विविधता त्यामुळे त्यांचे जीवनचरित्रही विविधपूर्ण आहे. आणि हेच जीवन-चित्र लीळाचरित्रात उतरले आहे. चक्रधराप्रमाणे गोविंदप्रभूचे जीवन अनेक घटनांनी समृद्ध नाही. श्रीगोविंदप्रभुचरित्रात घटना, प्रसंग, व्यक्ती ह्या लीळाचरित्राच्या मानाने विविध वा विपुल नाहीत. म्हणून लीळाचरित्र जितके मनोवेधक, आकर्षक वाटते तितके श्रीगोविंदप्रभुचरित्र वाटत नाही. गोविंदप्रभु हे ऋद्धिपूर सोडून फारसे कोठे गेलेच नाहीत. चक्रधरांचे जीवन गोविंदप्रभूपेक्षा अधिक तडफदार आहे. चक्रधरांची वेगवेगळ्या व्यक्तिसंबंधातली त्यांची वागणूक, त्यांचे वर्तन व त्यांच्या ठिकाणचे मनुष्यत्व यामुळे त्यांचे चरित्र आकर्षक वाटते. चक्रधरांच्या जीवनासंबंधी आपल्याला सतत जिज्ञासा वाटत राहते. आणखी कोण भेटणार, कोणकोणते शिष्य चक्रधरांना येऊन मिळणार याबाबत आपली जिज्ञासा लीळाचरित्र वाचताना केव्हाच नष्ट होत नाही. चक्रधरांच्या ठिकाणी जी वेधक शक्ती होती आणि जिच्यामुळे एवढा मोठा शिष्यसंप्रदाय निर्माण झाला तसली शक्ती गोविंदप्रभूंच्या ठिकाणी नव्हती.

गोविंदप्रभूंचा आचार, वागणे, बोलणे, चालणे, बसणे, उठणे, खाणेपिणे, वेष घेणे हे सगळेच चमत्कारिक होते, विचित्र होते. ते विदेही अवस्थेत राहत असत.

"आवो मेली जाय" ही शिवी त्यांच्या तोंडी नेहमीच असावयाची. आणि कोणतीही गोष्ट आपल्या मनासारखी झाली म्हणजे "ऐया माझा : आता होए म्हणे :" असे आनंदोद्गार त्यांच्या मुखातून बाहेर पडायचे. काम करून घेतल्यानंतर एखाद्याला उगीचच थापटा मारण्याची त्यांना सवय होती. त्यांची आणखी एक मोठी सवय म्हणजे खादाडपणा. खादाडपणामुळे त्यांचे पोट नेहमी दुखायचे; अन्नावर त्यांची विशेष वासना होती. त्यांच्या ठिकाणी अव्यवस्थितपणाही फार होता. थोडक्यात, त्यांचा वेष, खाणे, पिणे, बोलणे, चालणे, वेड्यापिशाला शोभण्यासारखे होते. वयाच्या ६५ व्या वर्षी त्यांना वधूशिवायच लग्नाची प्रवृत्ती होते. त्यांच्या या लोकविलक्षण वर्तनामुळेच गोविंदप्रभूंचा अवतार हा "वेडापिसा अवतार" म्हणूनच महानुभाव पंथात प्रसिद्ध आहे. चक्रधर अशा प्रकारचे नाहीत. श्रीगोविंदप्रभुचरित्रापेक्षा लीळाचरित्रात म्हाइंभटाने संवादलेखनाला जे महत्त्व दिले त्याचे कारण चक्रधर हे चतुरोक्तीपूर्ण बोलत असत. 'मऱ्हाटी तरी अनवरत बोलत असेतिः' असा त्यांचा लौकिक आहे. त्यांच्या बोलण्यातून चतुरता, उपहास, विनोद व्यक्त होतो. तसे गोविंदप्रभूंचे नाही. गोविंदप्रभूंचे बोलणे म्हणजे "वेंभळ : तेचि कैसे : ना : मेली आली : तथा : मेली गेली : तथा तोचि शब्द पुन्हा पुन्हा बोलणेः" अशा प्रकारचे होते. गोविंदप्रभु हे सिद्ध पुरुष असले, महानुभावपंथप्रवर्तक यांचे ते गुरू असले तरी आचाराने ते चक्रधरासारखे वाटत नाहीत. चक्रधरांची प्रकृती व गोविंदप्रभूंची प्रकृती ह्यात मूलतःच हा भेद असल्यामुळे लीळाचरित्राच्या मानाने श्रीगोविंदप्रभुचरित्र फिके वाटते यात संशय नाही. ह्यात म्हाइंभटाचा दोष नसून त्याने श्रीगोविंदप्रभुचरित्राचे कथन तितक्याच निष्ठेने व काटेकोरपणे केले आहे. लीळाबद्दल, माहिती–तपशीलाबद्दल तो अत्यंत साक्षेपी आहे. जे माहीत आहे तेच लिहितो व जे माहीत नाही ते लिहीत नाही. तपशील व सत्याबद्दल म्हाइंभटाला विलक्षण चाड आहे म्हणून त्याच्या या चरित्रालाही तसे महत्त्व आहे. गोविंदप्रभूंच्या व्यक्तिमत्वास स्वतःच्या अशा काही मर्यादा असतील, ते चक्रधरांच्या तोलामोलाचे नसेलही परंतु त्यांचे वेगळेपण श्रीगोविंदप्रभुचरित्रातून निश्चितच उठून दिसते. चक्रधरांच्या लीळाचरित्राची गोडी अधिक आहे हे मान्य करूनही आपण भक्तिभावाने 'श्रीगोविंदप्रभुचरित्र' वाचू लागलो तर त्यातही आपणास गोडी वाटेल.

◆ ◆ ◆

# कै. प्रा. दि. के. बेडेकर

## श्रद्धांजलि

प्रा. दि. के. बेडेकर ( जन्म ८-६-१९१० ) हे अनपेक्षितपणे काही थोड्या दिवसांच्या आजारानंतर ३ मे १९७३ रोजी मुंबई येथे निधन पावले. फेब्रुवारी १९७३ पासून त्यांना ताप येऊ लागला. त्यांचे निदान करण्याकरिता ज्या पुणे व मुंबई येथे त्यांच्या प्रकृतीच्या तपासण्या झाल्या, त्यात एप्रिलमध्ये अखेरीस त्यांच्या फुपफुसाला कर्करोगाने पछाडले आहे हे निदान झाले. त्याप्रमाणे ३ मे रोजी त्यांच्यावर शस्त्रक्रिया करण्यात आली व ती यशस्वी झाली, असे डॉक्टरांना वाटले. परंतु त्यांच्या जखमेतून रक्तस्राव होणे थांबले नाही. शस्त्रक्रियेनंतर जखमेतून रक्तस्राव होण्याचा डॉक्टरांनाही अनपेक्षित असा चमत्कार – जो पाच हजारांमध्ये एखाद्याच्या बाबतीत दिसून येतो– प्रा. दि. के. बेडेकर यांच्या बाबतीत घडून आला. व ते त्याच दिवशी ( ३ मे १९७३ ) संध्याकाळी निधन पावले. कर्करोग भयानक खरा पण त्याचे निदान अगदी आरंभी लवकर झाल्यास, त्या रोगापासून पुढे मुक्त रहाण्याची आशा तद्विषयक आधुनिक वैद्यकशास्त्रीय संशोधनाने निर्माण केली आहे. त्यामुळे बेडेकरांचे आप्त व मित्रवर्ग या आशेवर विसंबून होते. स्वतः बेडेकरांनी ऑपरेशनच्या आदल्या दिवशीच म्हणजे २ मे १९७३ रोजी आपल्या काही जिव्हाळ्याच्या मित्रांना जी पत्रे लिहिली त्या पत्रातून आपण या ऑपरेशनमधून सुखरूपपणे बाहेर पडणार व आपला अपुरा राहिलेला 'म. गांधी'वरील प्रबंध जुलैमध्ये पुरा करणार असे आत्मविश्वासपूर्ण उद्‌गार काढले होते. परंतु त्यांच्या आजाराला अनपेक्षित वळण मिळून, त्यातच त्यांचे निधन झाले. मानवाचा आत्मा अमर आहे असे मानणाऱ्या पारंपरिक अध्यात्मवादावर त्यांचा विश्वास नव्हता. 'मानव शेवटी सान्तच आहे' असे शास्त्रीय सत्य मानणारे ते 'नास्तिक' होते. एका बाजूला आधुनिक वैद्यकशास्त्राच्या साहाय्याने आपण या शस्त्रक्रियेतून सुखरूप बाहेर पडू असा आत्मविश्वास बाळगणारे व दुसऱ्या बाजूला मानव हा सान्त आहे अशी मनोमन जाणीव असल्याने बेडेकर शस्त्रक्रियेच्या टेबलावर उल्लसित, विनोदी, खेळकर वृत्तीने गेले पण विचित्र योगायोग असा की,

अनुक्रमणिका






'मानव हा सान्त आहे' ही तत्त्वज्ञानात्मक निष्ठा बाळगणारा हा महामानव अनपेक्षितपणे तडकाफडकी अन्त पावला !

माझा व त्यांचा नात्याचा संबंध नव्हता. परंतु सुमारे २५ वर्षांपूर्वी त्यांची व माझी ओळख होऊन तिचे या अवधीत दाट परिचयात व स्नेहात रूपांतर झाले. १९४७ च्या ऑक्टोबरमध्ये 'नवभारत' मासिकाचा पहिला अंक निघाला. 'नवभारता'चा कार्यकारी संपादक या नात्याने १९४७ च्या मे पासून माझी व त्यांची प्रथम ओळख झाली. 'नवभारत' मासिक महाराष्ट्रातील पुरोगामी विचारवंतांचे मुक्त व्यासपीठ बनावे अशी त्या वेळचे 'नवभारता'चे संचालक श्री. शंकरराव देव व संपादक मंडळातील आचार्य जावडेकर व आचार्य भागवत इत्यादी मंडळींची तळमळ होती. त्या करिता सुयोग्य असा पुरोगामी लेखकवर्ग 'नवभारता'ला मिळविण्यासाठी जे प्रयत्न झाले त्या प्रयत्नांत एक अग्रगण्य वाटा प्रा. दि. के. बेडेकरांचा होता. १९४७ पासून आरंभीची काही वर्षे 'नवभारता'त कोणकोणत्या विषयावर लेख यावे यावर विचारविनिमय करण्याकरता काही विचारवंत लेखकांच्या एका अनौपचारिक सल्लागार - समितीशी ८।१५ दिवसांनी 'नवभारता'चे संपादक विचारविनिमय करीत असत. या सल्लागारसमितीत प्रा. सरदार, प्रा. दि. के. बेडेकर इत्यादी विचारवंत नियमित भाग घेत असत. प्रा. दि. के. बेडेकर यांचा विविध स्तरांतील विचारवंतांशी दाट परिचय होता. त्यामुळे 'नवभारता'ला उच्च दर्जाचे विचारप्रचुर लेख सतत मिळत राहून मासिकाचा उच्च दर्जा राखण्यात यश मिळत गेले. प्रा. दि. के. बेडेकर यांनी 'नवभारता'करिता चांगले लेखक मिळवून दिले एवढेच नाहीतर त्यांनी स्वतः 'नवभारता'तून पहिली दहा वर्षे प्रत्येक अंकाकरिता लेख देऊन विपुल लेखन केले. ते प्रतिभाशाली लेखक असून त्यांची बुद्धी कुशाग्र व सर्वगामी होती. समाजशास्त्र, तत्त्वज्ञान, राज्यशास्त्र, मानवेतिहासशास्त्र, साहित्यसमीक्षा इत्यादी क्षेत्रातील विविध विषयांवर त्यांनी मूलगामी व प्रतिभासंपन्न लेख दिले. 'नवभारता'च्या पहिल्या दहा वर्षांतील (१९४७–१९५७) अंकांतून त्यांचे सुमारे चाळीसावर लेख प्रसिद्ध झाले. त्यातील काही लेखांचे मथळे जरी पाहिले तरी त्यांच्या बुद्धीच्या व ज्ञानाच्या विशाल आवाक्याची कल्पना येते. उदाहरणार्थ पुढील मथळे पहा : 'कलावंताचे स्वातंत्र्य (वर्ष १, अंक २) 'विरोधविकास नव्हे, द्वंद्वात्मक स्वयंगति' (३, ४), 'रसव्यवस्थेची पार्श्वभूमि' (४, २), 'देवासुर द्वंद्वाचे नाटच' (४, ३), 'करुणरस व शोकांतिका : समाजाला पूर्णत्वाकडे नेणारे उदात्त वेड' (५, १), 'महाराष्ट्रातील मार्क्सवादी तत्त्व-

मीमांसा' (५, ४), रवीन्द्रसाहित्याचे वैशिष्टच' (५, ८) 'ग्रामसंस्था व सांख्यदर्शनातील प्रकृति' (७, ६), 'यज्ञकल्पनेचा उगम व स्वरूप' (८, ५), 'केशवसुतांची स्वर्गसमक्षतेची कल्पना' (९, ३), 'टिळकांच्या गीतारहस्यातील दुहेरी साध्य' (९, ११), 'भाषिक राज्यांची भारतीय पार्श्वभूमि' (१०, १-२), 'इतिहासमीमांसेच्या मर्यादा' (१२. ८). स्वतः ते सहृदय साहित्यसमीक्षक तर होतेच पण त्याबरोबरच सर्जनशील कवीही होते. त्यांच्या कविता 'नवभारता'तून ज्या प्रसिद्ध झाल्या त्यांचे मथळे असे : 'अमृतकलश' (वर्ष ४, अंक १२), 'कशास पुसता त्याचे नाव ?' (६, ११), 'अशा त्या एका क्षणी' (८, ९).

वर 'नवभारता'तून त्यांनी केलेल्या लेखनाची जंत्रीच देणे सध्या शक्य झाले आहे. 'नवभारता'तील लेखनाशिवाय, त्यांनी तत्त्वज्ञान व साहित्यसमीक्षा या क्षेत्रात जे लेखन केले आहे, ते अनेक ग्रंथांच्या रूपाने मराठी वाचकांसमोर आहेच. त्या ग्रंथांतून त्यांची प्रतिभासंपन्नता, मूलगामी दृष्टी, ज्ञानाच्या विविध प्रांतांत दिसून येणारा त्यांच्या बुद्धीचा विलास, चिंतनशीलता, सुबोध अभिजात लेखनशैली इत्यादी गुण प्रकर्षाने दिसून येतात. त्यांचा पिंड केवळ तत्त्वचिंतकाचा नव्हता तर सामाजिक प्रबोधन घडविण्याचा प्रयत्न करणाऱ्या तळमळीच्या कार्यकर्त्याचाही होता.

'नवभारता'च्या आरंभीच्या काळात लेखन करून प्रा. दि. के. बेडेकर यांनी 'नवभारता'शी जो ऋणानुबंध जोडला, त्याचे स्मरण होऊन कृतज्ञतेने हृदय भरून येते. त्यांच्या स्मृतीस सस्नेह अभिवादन !

– वि. म. बेडेकर

अनुक्रमणिका